॥ श्री ॥

मल्हार रामराव चिटणीस विरचित

# थोरले शाहू महाराज यांचें चरित्र.

हें

अनेक प्रतींवरून शुद्ध करून अर्थनिर्णायक व अवांतर

माहितीच्या विपुल टीपांसह

काशिनाथ नारायण साने, बी. ए. ( डेक्कन कॉलेज )

यांणीं

प्रकाशित केलें.

वृत्ति दुसरी.

उद्धृता यवनाः सर्वे राज्यं च ब्रह्मसात्कृतम् ।
यत्र सुनिहितं साम्बे किं कर्तव्यमतःपरम् ॥

पुणें येथें "ज्ञानप्रकाश" छापखान्यांत छापिलें.



शके १८१५.

॥ श्री ॥

मल्हार रामराव चिटणीस विरचित

# थोरले शाहू महाराज यांचें चरित्र.



हें

अनेक प्रतीवरून शुद्ध करून अर्थनिर्णायक व अवांतर

माहितीच्या विपुल टीपांसह

काशिनाथ नारायण साने, बी. ए. ( डेक्कन कॉलेज )

यांणीं

प्रकाशित केलें.

आवृत्ति दुसरी.



उद्धृता यवनाः सर्वे राज्यं च ब्रह्मसात्कृतम् ।

चित्तं सुनिहितं साम्बे किं कर्तव्यमतःपरम् ॥





शके १८१५.

हा ग्रंथ

महाराष्ट्राच्या भाषेचा आणि इतिहासाचा

आस्थापूर्वक अभ्यास करूं इच्छि-

णाऱ्या सज्जनांस प्रेमपूर्वक

अर्पण करितों.

ग्रंथप्रकाशक.

# अनुक्रमणिका.

# शुद्धिपत्रक.



| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | २ ( खालून ) | मागानगर | भागानगर |
| १० | ५ | चांकी | चौकी |
| १० | ४ ( खालून ) | गगां | गंगा |
| ११ | १९ | दूतभातावर | दधभातावर |
| ११ | २८ | केलें | केल |
| २५ | १५ | तोपखाना | तोफखाना |
| ३४ | २३ | यांजकडे | यांजकडे, |
| ३५ | ४ | पदकें | पथकें |
| ३७ | ४ | त | ते |
| ३९ | ४ | घेण | घेणें |
| ५९ | १६ | राहिलेला आमचा | राहिले अमलाचा |
| ५९ | १७ | आमची | आमचा |
| ७१ | १९ | धरिलें | धरिले |
| ७१ | २९ | सांगतली | सांगितली |
| ७३ | ८-९ | मजमदार | मजमुदार |
| ८४ | १९ | लाक | लोक |
| ८४ | १९ | वागवन | वागवून |
| ८४ | शेवटची | १७४५८ | १७५८ |
| ८७ | ४ | हजरे | हुजरे |
| ९२ | २६ | आधिपति | अधिपतिं |

# उपोद्घात.

हें चरित्र सातारकर महाराजांचे चिटणीस मल्हार रामराव यांनीं दुसरे शाहूराजे यांचे आज्ञेवरून लिहिलें. मल्हार रामराव व त्यांचे पूर्वज हे मोठे हुद्देदार असून महाराजांच्या अति निकट वागणारे असल्यामुळें सर्व कागदपत्र त्यांच्या ताब्यांत होते व त्यांस परंपरागत आंतील बारीक बारीक माहितीही इतरांपेक्षां विशेष होती. ह्या सर्वांच्या आधारें त्यांनीं शककर्ते शिवाजी महाराज यांजपासून तों दुसरे शाहू यांच्या अखेरीपर्यंत हा चरित्ररूपी इतिहास लिहून ठेविला. त्यांतील हें थोरले शाहू महाराजांचें चरित्र होय. चिटणिसांच्या घराण्याची हकीगत मागें प्रसिद्ध झालेल्या " कायस्थ प्रभूंच्या इतिहासाचीं साधनें " या नांवाच्या मासिक पुस्तकांत बरीच दिली आहे. तेव्हां येथें तिजबद्दल विशेष लिहिणें नको. तिजपेक्षां अधिक सविस्तर माहिती मिळाल्यास पुनरावृत्तीचा प्रसंग आलाच तर तींत दाखल करितां येईल.

ह्या चरित्राच्या आम्हांस एकंदर तीन प्रती मिळाल्या. एक तर चिटणीस यांजकडील आहे. तिचें वर्णन संभाजी महाराज यांचे चरित्राच्या उपोद्घातांत दिलें आहे. दुसरी प्रत कोल्हापुराहून रा० रा० विष्णु धोंडदेव वीरमाडकर यांनीं पाठविली. ही राजाज्ञा यांचे प्रतीवरून लिहून घेतलेली आहे असें तिच्या शेवटीं लिहिलें आहे यावरून समजतें. हिला 'कोल्हापूर प्रत' असें पुढें म्हणूं. ही खर्ची कागदावर सुवाच्य अक्षरानें लिहिली आहे. हिचे उभे बंद पाठपोठ ८३ आहेत. शके १७८४ दुंदुभीनाम संवत्सरीं ही लिहिली गेली. शेवटीं " यादृशं पुस्तकं दृष्ट्वा तादृशी [ शं ] लिखित [ तं ] मया " हा श्लोक लिहिला आहे. हिच्या व चिटणीस यांच्याकडील पुस्तकाच्या पाठांत जागोजाग फरक दृष्टीस पडले, परंतु अर्थांत अंतर क्वचितच दिसलें. तेव्हां जेथें जेथें अर्थांत फरक दृष्टीस पडला तेथें तेथें मात्र तो दर्शविला आहे. तिसरी प्रत 'इंदुरची' ही प्रत राव बहादूर नी० ज० कीर्तने यांनीं पाठविली. ती कोल्हापूर येथून इंदुरकर किबे यांनीं तयार करून आणविली असेंही रावबहादुरांनीं आम्हास कळविलें आहे. हल्लीं ही प्रत व कोल्हापूर येथील प्रत ह्या ताडून पाहतां त्यांचा एकमेकींशीं इतका मेळ पडला कीं, त्या दोन्हीही 'राजाज्ञा' यांच्या प्रतीवरून उतरून घेतल्या असाव्या अशी खात्री होते. कोठें कोठें 'इंदुरप्रत' करणारास मूळ बखर चांगली लागली नसावी असें दिसतें, पण अशीं स्थळें फार नाहींत. इंदूर येथील प्रतीचें वर्णन संभाजी महाराज यांच्या चरित्राच्या उपोद्घातांत दिलें आहे.

प्रथमत: हे चरित्र आम्हीं काव्येतिहास-संग्रहांत प्रसिद्ध केलें. त्या वेळीं नजरचुकीनें राहून गेलेलीं अशुद्धें काढून व जागोजाग विशेष उपयुक्त माहिती देऊन ही निराळी आवृत्ति तयार केली आहे. ती लोकाश्रयास पात्र होवो.

**का० ना० साने.**

श्री.

# मल्हार रामरावकृत थोरले शाहू महाराज यांचें चरित्र.

श्रीमंत महाराज राजश्री शाहू छत्रपति यांचें चरित्र. शिवाजी महाराज यांनीं "पुनः शिव नामें करून [राजा] जन्म घेऊन उत्तर-दिग्विजय करणें राहिला तो होईल," ऐसी समाप्त[1] समयीं[2] आज्ञा केली. त्या अन्वयें जन्म जाहला. शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध १०. या नंतर बालचरित्र जाहलें. पुढें प्रसंगेकरून औरंगजेब याजपाशीं जाणें घडलें, तेथून पुन्हा नष्टचर्य दिवस गेलियावरि राज्यावरि येणें घडलें, त्यांतील चरित्र जाहलें तें लिहिलें. सर्व राजाचिन्हें लक्षणेंकरून युक्त, आजानुबाहु, रूपें-करून परम सुंदर, ऐसे होऊन वयें करून आठ वर्षांचे जाहले. त्यांत सर्व शास्त्र विद्या व घोडीं फेंकणें ऐसे गुणसंपन्न जाहले. संभाजी महाराज औरंगजेब यांणीं नेऊन विज्वर[3] प्रसंग गुजरला. राजाराम साहेब चंदीस निघोन गेले. ते समयीं शिवाजी राजे व त्यांची मातुश्री येसूबाई साहेब व आणखी कबिले[4] मदनसिंग[5] सर्व रायगडावरि संभाजी राजे यांचा इलाखा[6] राहिला. तेथें जुल्फकारखान[7] व हबशीचा[8] वेढा बसोन नऊ महिने किल्ला

---

१. समाप्त समयीं=समाप्ति-समयीं—चैत्र शुद्ध १५ शके १६०२ (इ० सन १६८०) ते दिवशीं दोन प्रहरीं रायगडीं शिवाजी महाराजांनीं कैलासवास केला.

२. मरणाचे पूर्वी शिवाजी महाराज सर्व मंडळीशीं बोलत असतां "एक घटिका-पर्यंत नेत्र झांकून स्तब्ध जाहले आणि मुखांतून अक्षर आलें कीं, संभाजी दगा पावेल. राजाराम बंदीकडून पुन्हा राज्य रक्षील. मोरोपंडित, निराजी रावजी, रामचंद्र नीळकंठ, संताजी घोरपडे, धनाजी जाधव पुन्हा राज्यवृद्धीस कारण होतील. पुढें शिवनामें राजा होईल तो दिल्लीपर्यंत राज्य करील. इतकें बोलोन सर्वांकडे पाहिलें." असें मल्हाररामरावकृत शिवाजी शककर्ते यांच्या चरित्रांत लिहिलें आहे.

३. विज्वर=अति कठक, प्राणांताचा. संभाजीस तुळापुरीं, शके १६१० (इसवी सन १६८९) सालीं मारिलें.

४. कबिला=कुटुंब, स्त्री—हा फारसी शब्द नेहमीं पुल्लिंगी आहे संस्कृत 'दाराः' याजप्रमाणें पुल्लिंगी आहे मराठींत मात्र 'दारा' शब्दाचा स्त्रीलिंगी प्रयोग करितात.

५. मदनसिंग—हा संभाजीचा दासीपुत्र.

६. इलाखा=भाग, त्यांचीं माणसें.

७. झुल्फकारखान—ह्यानें दक्षिणेंत मोठमोठे पराक्रम केले. पुढें राजाराम चंदीस (जिंजीस) असतां तो किल्ला काबीज करण्याचें काम ह्याजकडेसच सोंपविलें होतें. ह्याजवर पादशहाची मोठी मर्जी असे.

८. हबशी=जंजिरे येथील. ह्यांचें व मराठ्यांचें प्रथमपासून हाडवैर होतें. हे दिल्ली-पतीचे अंकित म्हणवीत असत.

लढविला. ते समयीं खान याणीं व बेगमेनें तह करून इमान प्रमाण देऊन उतरोन पादशहापाशीं घेऊन गेले. शके १६११ शुक्लनाम संवत्सरे सन तिसेन व अलफ. ते समयीं महाराजांबरोबर गेले [ ते ] लोकः–मोरोपंत सबनीस, जोत्याजी केसरकर व उद्धव योगदेव राजाज्ञा, कारभारी व कारकून लोक, शागिर्दपेशी, सेवेचे लोक, कारखानदार असे हजार पांचशें बराबर गेले. पादशहापाशीं गेलियावरि बरकड यांचे वडील आजपर्यंत जाले ते चोर, [ त्यांणीं ] पाळेगिरी केली. पादशाईत बदलून राज्य निराळें केलें. आम्हांस रुजू जाहले नाहींत. हे जाले. आमचे बेगमेनें पुत्र म्हणविले ते नातू जाहले. यांचें नांव शाहू असें म्हणावें. असे शाहू राजे म्हणो लागले. भागानगर व विजापुराची पादशाई घेऊन पादशहानें नजरबंद केलें. त्यांचे बंदोबस्त खर्च चालणें वगैरे देऊन बहुत तरतूद, त्यांस पाहिजे [ तो ] पदार्थ खर्चवेंच वगैरे देऊन व त्यांचे लोक सुद्धां करून दिल्हे. त्या समयीं भागानगरचे तानाशा पादशहा याणीं एक समयीं औरंगजेब यांचे नगारची याणीं मध्यरात्र समयीं सनईत तान केली [ ती ऐकिली. ] ती बहुत चांगली झाली. त्याजवर खुष होऊन लाख रुपये बक्षीस द्यावे बोलिले. हें वर्तमान बातमीदार चौकीचे होते त्यांणीं पादशहास कळविलें. यावरून औरंगजेब याणीं लाख रुपये पाठवून दिल्हे. ते सनईवार बोलावून त्यांणीं इनाम बक्षीस दिल्हे. याप्रमाणें इतमाम राखिले होते. त्या अन्वयें यांचाही लवाजमा लोक व खर्च होता त्याप्रमाणें खर्चाचा दरमहा बांधून हत्ती, घोडे, आणखी लहान यांस बसावया योग्य ऐसे व बस्त्रे जवाहीर देऊन, दोन चार दिवस दरबारीं यावें, बोलवावें, बहुमान करावा, याप्रमाणें ठेविलें. यांचें रूप व गुण पाहून बहुत संतोषी जाहले. पादशहा विजापूर, भागानगर, औरंगाबाद या प्रांतांत जिकडे जिकडे छावणी करून राहिले तिकडे [तिकडे] यांसही समागमें बेगमचे गोटांत बहुत इजतीनें बहुमानें राह[वा]वें. नित्य बेगमेनें समाचार घेणें, येणें, जाणें असें करून ठेविलें.

---

९. उद्धव योगदेवाचें नांव चिटणीस प्रत देत नाहीं. इंदूरप्रत व कोल्हापूर मात्र देतात.

१०. शागीर्द–ह्या शब्दाचा मूळार्थ विद्यार्थी, शिष्य, असा आहे. त्यावरून हल्लींचा अर्थ पुढें उत्पन्न झाला. याप्रमाणेंच 'शिष्य' शब्दाचाही मूळार्थ फिरून 'परिचारक' ह्या अर्थी प्रयोग कोठें कोठें होतो. पेशा=धंदा. शागिर्दपेशा=शिष्यमंडळ, परिचारकजन.

११. रुजू होणें=भेटणें, नजर देणें, अंकित म्हणविणें.

१२. भागानगर=हैदराबाद. हें शहर गोंवळकोंडें येथील एका बादशहानें आपलें 'भागू' नांवाचे वेश्येकरितां बांधून दिलेल्या बंगल्याभोंवतीं वसलें म्हणून त्यास 'भागानगर' असें नांव पडलें.

१३. तानाशाहा–हा गोंवळकोंड्याचा शेवटचा राजा. ह्याचें नांव अबुहुसेन असें होतें. तानाशाहा नांवाच्या फकिराचा ह्याजवर कृपाहस्त होता म्हणून त्याच नांवानें तोही प्रसिद्धीस आला. विजापूर १६८६ सालीं व गोंवळकोंडें १६८७ सालीं औरंगजेबानें घेतलें.

१४. "बेगमेचे बाडांत गोटीं." चिटणीस प्रत. बाड=कनात, तंबू.

१५. इजत–'प्रतिष्ठा इजतिः स्मृता' राजव्यवहारकोश.

याप्रमाणें बहुत दिवस गुजरले. महाराज वयसंपन्न सोळा वर्षांचे जाहले. राजाराम साहेब चंदी चंदावर प्रांतीं गेले. बराबर मोठे सरदार व सरकारकून मुत्सद्दी सर्व गेले. धनाजी जाधवराव, संताजी घोरपडे, पर्सोजी[16] भोंसले, खंडेराव दाभाडे यांच्या वीस वीस हजार फौजेच्या टोळ्या करून मुलुख मारणें, अंमल बसविणें, लढाई देणें करून पादशाई फौज बहुत हैराण केली. यावरून [ शाहू महाराज हे ] बहुत युक्तीनें तिकडे राजकारण कांहीं एक न करितां, " तिकडे आमचें नांव अगदीं काढूं नये. कोण्ही [ आम्हांकडे ] पाठवूं नये, आम्हीही काढीत नाहीं. कसेही दिवस काल अतिक्रमण करितों. ईश्वर यांचे पराभवाचा दिवस आणील ते दिवशीं गोष्टी घडून येतील. यांचें पेंचांत प्रतिबंधांत राहणें आलें. हे दिवस ' तुम्ही आम्हांस बदलून राज्य करणार, आमचा त्याग केला, ' असें बोलोन काढीत आहों." ह्मणून सांगून पाठवून पादशहाची मर्जी संपादून या रीतीनें बोलोन राहिले. वास्तव पादशहाही कांहीं एक यांचें लक्ष तिकडे[17] नाहीं, म्हणून तारीफ करूं लागले. यांणीं पादशहापाशीं " आमचें राज्य, वडील आम्हीं, परंतु चुलते यांणीं लोभ धरून आपणच गादी व शिक्के आपले नांवें करून घेतले. ते आपण सोडवून देतील तेव्हां आमचे आम्ही करूं. त्यांचें पारपत्य करून आम्हांस स्थापना करावी. " असे वारंवार बोलावें. यावरून [ पादशहा ] बहुत खूष जाहले.

या नंतर शाहू महाराज वयस्क जाहले [ तेव्हां ] यांचें लग्न करावें असा बेगमेनीं अर्ज केला. तेव्हां पादशहानीं उद्धव[18] योगदेव राजाज्ञा व भोरोपंत सबनीस व जोत्याजी केसरकर यांस आज्ञा केली कीं, " आमचे पदरीं मातबर उमराव, सरदार आहेत यांत राजांचे शरीर संबंधी पूर्वीं पासून होत असतील त्यांच्या कन्या पाहून उत्तम ऐशा योजाव्या आणि लग्न करावें." म्हणून समारंभास खर्चास लाख रुपये देवविले. आणि तरतूद करावी [ असें ] सांगितलें.

कोणी एके दिवशीं पादशहा तख्तावरून उठते समयीं पायमोचे मखमाली होते ते महाराजांनीं हात लावून पुढें केले. यावरून बहुत संतोषी होऊन हातीं रुमाल होता तो बक्षीस दिल्हा. त्याची पूजा नित्य करावी ऐसें करून ठेविला. कोणे एके समयीं जवळ बसले असतां, " राजे ! तुमचे वडील मारिले असतां तुम्ही बहुत नेकीनें चालतां; तुमचे चुलते यांणीं सर्व तुमचें राज्य, दौलत आटोपून आम्हांशीं [ते] लढतात, त्यास तुम्हांस त्यांजकडे लावून देतों; जावें, " बोलिले. तेव्हां यांणीं उत्तर केलें जे, " पूर्वींही आमचे वडील असतां त्यांस नजरबंदींत ठेवून राज्य आपण करावें, ऐसा विचार [ चुलते यांनीं ]

---

१६. " सोनजी भोंसले " इंदूर प्रत

१७. तिकडे= राजारामाकडे.

१८. उद्धव योगदेवाचें नांव चिटणीस प्रत देत नाहीं. मागें टीप ९ पहा.

करून केलें होतें. " या नंतर आम्हांस आमचे इलाखा सुद्धां रायगडीं टाकून आपले कबिले सुद्धां निघून गेले. आम्हीं त्यांजकडे गेलों असतां आम्हांस न-नरबंद ठेवतील. आपण त्यांचें पारिपत्य करून आम्हांस राज्यावर बसवितील तेव्हां राज्य करूं." ऐसें बोलिले. यावरून बहुत संतोषी जाहले.

यानंतर " राजे यांस दोन नवऱ्या करावयाच्या पाहिल्या कीं नाहीं " म्हणून कारभारी यांस विचारिलें. तेव्हां रुस्तुमराव जाधव यांची कन्या एक व शिंदे कण्हेरखेडेंकर यांची एक योजिली आहे असें समजाविलें. यावरून त्यांसही ख-र्चास देऊन उत्तम प्रकारें समारंभ करवून मराठे यांचे चालीप्रमाणें लग्नें कर-विलीं. आपण जाऊन बसोन मेजवानी घेणे वगैरे केलें. शिंदे यांचे कन्येचें नांव सावित्रीबाई ठेविलें. जाधवराव यांचे कन्येचें नांव अंबिकाबाई ठेविलें. नंतर कोणे एके दिवशीं, " लग्नें जाहलीं, नवरी पाहण्यास आणावी " सांगितलें. तेव्हां मराठी विचार, नवरी नेहणें ठीक नाहीं. म्हणून येसूबाई साहेब यांणीं बेगमेचे विचारें शिंदे यांजकडील आंदणी दासीची कन्या होती, चांगली पाहून ती न्यावीशी करून तिजला वस्त्रें, जवाहीर, अलंकार देऊन महाराज व तिज-ला पाठविली. ते समयीं पादशहा यांणीं राजे व तिजला जवळ बसवून "राजे! तुमचे वडील फौज धरून आम्हांपाशीं लढतात असें असोन कांहीं एक फितूर न करितां बहुत नेकीनें चालतां, तिकडे लक्ष ठेवीत नाहीं. तुमचें राज्य तुम्ही बहुत दिवस उभयतां कराल, " असें आशीर्वादात्मक बोलले आणि उभयतांस वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे देऊन निरोप दिल्हा. अक्कलकोट परगणा व इंदा-पूर, सुपें, बारामती, व नेवासें असे पांच महाल साजेंक[22] दुधास म्हणून दिल्हे. दोन लग्नें स्त्रिया केल्या. परंतु पादशहांनीं विरूबाई[23] सहवर्तमान आशीर्वाद देऊन उभयतांचे मस्तकीं हात ठेवून आशीर्वाद दिल्हेवरून तिजला खासगींत ठेवून उभयतांपेक्षां तिजवर कृपा करून ठेविलें.

याप्रमाणें महाराज पादशहाचे नजरबंदींत असतां इकडे राजाराम साहेब यांणीं पादशाहाशीं फौज पाठवून लढाया मारल्या व चंदीवर त्यांची फौज ये-ऊन चंदी घेतली. यावर रांगण्यास येऊन पादशहा भागानगर प्रांतींहून औ-रंगाबादेस आलियावरि औरंगाबाद [ येथील ] पुरे मारून जालनेंपूर मारून सिंहगडीं येऊन शके १६२१ फाल्गुन मासीं वारले. पुढें तारांबाईचे पुत्र

१९. संभाजी महाराजांचें चरित्र पृष्ठ ११२ पहा.

२०. कोठें शिर्के व मोहिते यांच्या कन्या योजिल्या असेंही आढळतें.

२१. अन्यत्र सकवारबाई व सगुणाबाई असें लिहिलें आहे.

२२ साजक=शुद्ध, अस्पृष्ट.

२३. विरूबाई हें त्या दासीपुत्रीचें नांव.

२४. थोरले राजाराम यांचें चरित्र—पृष्ठ ६५/६६ पहा.

२५. राजारामाचें लग्न ताराबाईशीं

( पुढें चालू. )

शिवाजी राजे यांस गादीवर बसविलें. ते वारले. शके १६२२ राजशक २८. या नंतर संभाजी राजे राजसबाईचे पुत्र बसवून नऊ वर्षेपर्यंत राज्य चालविलें. या नंतर पादशहा भागानगर प्रांतीं जाऊन औरंगाबाद, बराणपूर प्रांतांत छावणीस येऊन शके १६२८ व्ययनामसंवत्सरे सन सब्बा मया व अलफ नगरास वारले. त्यांत रोजें येथें नेऊन कबर केली. दिल्लीस अजमशाहा पादशहाजादे होते. त्यांणीं तेथील दौलतीचा बंदोबस्त व फौजेचा करून सर्व अमीर मिळवून घेऊन आक्रम केला. तख्तावर बसले. हें वर्तमान इकडे शाहाजादे बहादूरशहा पादशहापाशीं होते त्यांस कळलियावरि त्यांणीं सर्व फौज वजीर यांचा एका करून आपण वडील, तख्ताचे खावंद, जाऊन त्यांचें पारपत्य करून पादशाही करावी हे उमेद वाढविली आणि त्या प्रांतीं जाण्याचा विचार ठरविला. औरंगाबादेस जाऊन तेथील बंदोबस्त फौज सुभा ठेवून करून, वराड प्रांतीं जाऊन तिकडील बंदोबस्त करून, खानदेश प्रांतींचा बंदोबस्त करून बराणपुरापुढें चालले.

इकडे परशरामपंत प्रतिनिधि व रामचंद्रपंत अमात्य हे ताराबाई साहेबांपाशीं मुख्यत्वें कारभारी किल्ले प्रांत राखून होते. व संकराजी नारायण सचिव हेही पराक्रमें सिंहगड, राजगड वगैरे प्रांत राखून होते. त्यांणीं पादशाही फौज हिंदुस्थान प्रांतीं जाती, दूर गेली, ऐसें पाहून सर्व प्रांतांत पादशाही ठाणीं उठवून आपला अंमल बसवूं लागले. हें वर्तमान पादशहाकडे जाऊं लागलें. परंतु पुढील मसलतीची बहुत ओढ. यावरून तसेच नर्मदा उतरोन उज्जनी माळवा प्रांतीं जाऊन पावले. शाहूमहाराजही बराबर नेहले होते. त्या काळीं सर्व वजीर जमा करून विचार केला जे, " हिंदूंचें राज्य घ्यावें म्हणून पूर्वींही पादशहाजादेपणांत औरंगाबादेस शहर करून दौलताबादची पादशाही घेऊन [ औरंगजेब ] बहुत दिवस राहिले. परंतु घडलें नाहीं. पुढें शिवाजी राजे वारलेवर येऊन भागानगर, विजापूर पादशाही घेतली. संभाजी राजे धरून त्यांचा शेवट केला. शाहूराजे कैदेत बराबर ठेविले. शेवट या प्रांतींच कबर होऊन राहिले. सर्व प्रांत किल्ले घेतले. परंतु शिवाजी राजे यांचे पदरीं माणसें सरदार मुत्सद्दी मोठमोठे व राजाराम [ पुत्र ] यांणीं पुनः चंदीकडे जाऊन,

---

झालें तेव्हां तिचें नांव 'सीताबाई' असें ठेविलें होतें पण तिजवर वडील माणसांची मर्जी असे म्हणून तीं तिला माहेरच्या 'ताराऊ' ह्या नांवानेंच हांक मारीत. तेंच नांव पुढें प्रचारांत आलें.

२६. रोजें, रोजा–हें गांव नगराहून वेरुळास जातांना लागतें. थोरले राजाराम यांचें चरित्र पृष्ठ ७३ टीप २६ पहा.

२७ ही बखर लिहिणाराचा भ्रम आहे. वडील मुलगा महमद बहादूर हा पंजाबांत असून त्यानें दिल्लीकडील आटोप करून आपण सिंहासनारूढ झाला. अजमशहा हा धाकटा. तो दक्षिणेंत असून त्यानें दिल्लीची बादशाही मिळविण्याकरितां पुढें चाल केली. थोरले राजाराम चरित्र पृष्ठ ७३ टीप २८ पहा.

२८. 'रायगड' इंदूर प्रत.

नमून, लढाया करून राज्य राखिलें. तिन्ही पादशाही निरंकुश जाहल्या. परंतु हिंदु पुन्हा आहेत तसे आहेतच. हे जागाच हिंदूंची होय. याजकरितां शाहूराजे हे आपणापाशीं बहुत नेकीनें कैदेंत असतां चालले. व बेगमेनीं आपले बेटे म्हणविले, तेव्हां आमचे बेटेचें जाहले. त्यास यांस आपले म्हणवून यांचे राज्यावर यांस पाठवावें. आणि यांणीं पादशहाचें ऐसें म्हणवून आपले राज्याचा बंदोबस्त राखावा. पादशाईंत रुजू रहावें. येविशीं तिकडे जाऊन आपलें राज्य व फौज साधून कसे चालतात हे खातरजमा होय, तोंपर्यंत आपली मातोश्री वगैरे कबिलें मदनसिंग आम्हापाशीं ठेवावें, आणि यांची रवानगी करावी." ऐसें ठरविलें. आणि शाहूमहाराज यांस नेऊन विचारिलें जे, "तुम्ही जाऊन आपले राज्याचा बंदोबस्त करून बखेडे करणार यांचा बंदोबस्त करावा. बादशाई लक्षांत वागवून पादशाई मुलकास उपद्रव होऊं नये. तुम्ही याप्रमाणें निखालस वागतां अशी खातरजमा जाली म्हणजे दिल्लीस जाऊन तेथील बंदोबस्त जाला, आणि आम्ही तख्तनशीन जालों, म्हणजे तुमचे कबिले लावून देऊं; व तुम्हांस सरदेशमुखीचें वतन सहा सुभ्यांत चालतें याचे फर्मान व चौथाई सहा सुभ्यांचा अंमल चालत आहे त्याचे फर्मान व वतन घाट व बालाघाट, घाटावरील महाल विजापूर, दौलताबादेचे पादशाहींतील महाल भीमा, गंगा यांचे हद्दीचे निमेचे तहानीं चालावेत. दरोबस्त फर्मान करून देऊन पादशाई अंमलाचीं ठाणीं, किल्ले, कोटसुद्धां दरोबस्त तुम्हांस बक्षीस फर्मान करून देऊं. तूर्त सुभ्यांस वगैरे पत्रें 'यांचें राज्य, हे बंदोबस्त करतील' ऐशीं घेऊन जावें. कर्नाटक, गोंडवण, गुजराथ, चंदावरचें राज्य तुम्हांकडे, जे अंमल चालत आहेत ते तुमचें तुम्हाकडे चालावे. तुम्ही जे समयीं पादशाई प्रसंग पडेल, तेव्हां फौज घेऊन कुमक करावी. हुकूम मानावा." याप्रमाणें सांगितलें तें यांस कैदेंतून हरप्रकारें सुटून जाऊन, राज्य साध्य करून पादशहा मतलब करार करितात ते करार करून घ्यावे, म्हणून मान्य करून घेऊन निरोप घ्यावा, कबिले मातोश्री रहावीं ऐसें करून करारांत आणिलें. यावरून पादशहांनीं वस्त्रें जवाहीर हत्ती घोडे व दोनशें स्वार रांगडे नेमून दिल्हे. "पुढें जातां आपली फौज जमा करीत जावें," सांगून निरोप दिल्हा. बेगम, वजीर यांजकडे निरोपास जातां "लौकर निघून जावें,

२९. 'बंधुच' चिटणीस प्रत.

३०. 'यांची' (शाहूची) असतें तर बरें.

३१. तख्तनशीन=सिंहासनाधिरूढ.

३२. 'फर्मानं राजपत्रकम्' राजव्यवहार कोश.

३३. गंगा=गोदावरी.

३४. 'चालतात' चिटणीस प्रत.

३५. चंदावर=तंजावर.

३६. हा वजीर जुल्फकारखान होय. ह्याच्याच शिफारसीवरून शाहूस या वेळीं मुक्त केलें. "बेगम व वजीर यांणीं निरोप जातां लौकर निघोन जावें" इत्यादि चिटणीस प्रत.

पादशहास पुन्हा कोण कसें समजावितील, कशी बुद्धि होईल, म्हणून कूच करून जावें " सांगितलें. तें समयीं पादशाही ताकिदी सुभ्यांस देणार त्या घेऊन एक दोन दिवशीं मागून येऊन पावावें म्हणून जोत्याजी केसरकर ठेवून कांहीं शागीर्दपेशा कारकून उँद्धव योगदेव राजाज्ञा मातुश्रीपाशीं ठेवून सबनीस व कृष्णाजी नाईक जोशी कोंकणस्थ व नाशिककर गदाधरभट बराबर घेतले व शुक्लजी म्हणून तिकडील हिंदुस्थानी ब्राह्मण कन्होजी बहुत चतुर ठेविले होते, मनोरंजन करणार [ होते, ] ते बराबर घेतले. आणि पादशाई निरोप घेऊन बेगमेचा निरोप मातुश्री व कबिले मदनसिंग यांचे हवालीं करून घेतला. विरूबाई व एक राणी बराबर घेतली. एक राणी येथें असतां वारली होती. बेगमेनीं जाते समयीं बहुत खातरजमा केली. " तुमचें राज्य तुम्हीं साधावें. पादशहाशीं वांकडें चालूं नये. सनदा वगैरे देतील तें घ्यावें. तुम्हीं पादशहाचे नातूच आहां. आग्रह कोणताही न धरावा. " म्हणून आपले पूजेंत पंजे होते ते दिल्हे, " याची भक्ति पूजा निष्ठेनें राखावी. तुमचा हिंदुधर्म. " [ सबब ] यांचे पूजेस सैयद शहामिया म्हणून हवाली केले. " मजला यांची प्रसन्नता आहे. तुम्ही भक्ति करून सैयदापासून फैत्या करावी व इमाम साहेबांच्या फात्या नैवेद्य चिराग दरगा मकान करून फकीरफुकरा मोहरम उत्साह चालवावें, सांगितलें. मोठे संकटीं [ ही ] यास विसरूं नये. तुमची दौलत कायम चालेल. " म्हणून सांगून निरोप दिल्हा. वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे दिल्हे. "मातुश्रीविशीं कांहीं काळजी करूं नये. लौकरच रवानगी करून देववितों," सांगितलें. महाराज निघाले ते समयीं पादशहानीं बराबर स्वार रांगडे दोनशें नेमून दिल्हे. दोन चार हत्ती, घोडे दिल्हे ते घेऊन पुन्हा यांस कशी बुद्धि होईल जाणोन तत्काल निघाले. ते भरतपूर डीघ येथें आले. त्या राजांनीं बहुत सत्कार करून वस्त्रें, हत्ती, जवाहीर मेजवानी करून कांहीं लोक स्वार दिल्हे. तेथून पुढें दुसरे तालुक्यांत आले, तेथें त्यांणीं विकल्प चित्तीं आणून महाराजांस मेजवानीस नेहले. आणि यास तेथेंच बसवून, हत्ती, घोडे सलतैनत थोडी आहे, लुटून घ्यावें ऐसें मनीं म्हणून आपले लोकांची वगैरे तयारी वाड्यांत बाहेर केली. हे अगासिंग रजपूत महाराजांपाशीं होते. त्यांणीं समजून व महाराज यांणीं चर्या ओळखून तत्काल आपले लोक सुद्धां उठोन जमून उभे राहिले. यानंतर त्यांणीं बहुत सफाई [केली] बोलले. त्याचा विश्वास न धरितां आपले जमावानिशीं मुक्कामावर

३७. मागें टीप. ९ व १८ पहा.

३८. " फत्या ग्यारवी व इमाम साहेबाच्या फत्या " चिटणीस प्रत.

" भक्ति करून सदा पाठवून फत्या गारवी व इमाम साहेबाच्या " इंदूर प्रत.

फात्या=नैवेद्यार्पण, नैवेद्यार्पण करावयाचे वेळीं म्हणावयाचे शब्द. चिराग=दीप. दरगा=प्रार्थना करण्याची जागा. मकान=राहण्यास जागा. फकीरफुकरा=फकीर वगैरे यांचा समूह. इमाम साहेब=हसनहुसेन.

३९. सलतनत—चतुरंगदळ, फौजफांटा.

येऊन, तयार होऊन, संभाळून कूच करून जोतपुरीं जयपुरीं येऊन पावले. त्यांणीं मेजवान्या सन्मान वस्त्रे, जवाहीर, हत्ती, घोडे दिल्हे ते घेऊन व त्यांणीं आपली हद्द पार केली. नंतर उदापुरीं आले. त्यांणीं आठ दहा दिवस ठेवून घेऊन बहुत सत्कार केला. " तुम्ही या कुळांतील राजे. शिवाजी राजे यांणीं दक्षणचें राज्य केलें. तें साध्य करून मोठा प्रताप करून सिंहासन छत्र केलें. हल्लीं तुम्हांस समय प्राप्त होऊन यवनांचे नजरबंदींत बहुत दिवस रहाणें प्राप्त जालें, तेथें तुम्हीं बहुत चातुर्येंकरून दिवस काढून क्लेश भोगिले, ईश्वरांनीं कृपा केली, त्यांतून निघोन आपले राज्यावर चालला. जसे शिवाजी राजे यांणीं प्रताप केले, राज्याचे धोरे घातले, त्याप्रमाणें चालून धर्मस्थापना करून राज्य सांभाळावें व पराक्रम तसे करावे, म्हणोन सांगोन मेजवानी[४०] हत्ती, घोडे, जवाहीर, वस्त्रें, खर्चीस देशीं पावेतों देऊन फौज देऊन पाठविले[४१]. ते मोठ्या मोठ्या मजला करीत उज्जनी, महेश्वर करून विंध्याद्री, सातपुडा, घाट पार होऊन बरानपुरास आले. मार्गीं येतां जागां जागां बहु कसाला[४२] पडला. तेथें कारभारी वगैरे लोक यांणीं बहुत श्रम करून निभावून आले. विरूबाई व एक राणी बराबर आली. जोत्याजी केसरकर कांहीं कागदपत्र आणण्यास मागें ठेविले. तेही येऊन पावले. तिकडे असतां हिंदुस्थानी शुक्रजी म्हणून बहुत चतुर ब्राह्मण मनोरंजन करणार ठेविले होते ते बराबर आले. सबनीस व कृष्णाजी जोशी कोंकणस्त व नाशिककर गदाधर भट व शागिर्दपेशा लोक यांणीं बहुत श्रमसहास बराबर येतां केले.

याप्रमाणें देशीं येऊन पावले असतां परसोजी भोंसले वराड प्रांतीं पंधरा हजार फौजेनिशीं होते, त्यांस वृत्त समजलें. व चिमणाजी दामोदर म्हणून पेशवे पिंगळे यांजकडील सरदार पांच हजार फौजेनिशीं खानदेशीं होते. ते येऊन उभयतां सरदार फौज खजीना खर्चास घेऊन येऊन महाराजांस[४३] भेटले. जमाव जाला. सुभे मामलेदार सर्व येऊन भेटों लागले. चाकरी रहाण्यास लोक येऊं लागले ते कलमजारी[४४] करून फौज पायदळ ठेवूं लागले. मोरोपंत

४० " मेजवान्या जेवणीं एकाठायीं होऊन " चिटणीस प्रत.

४१. जोधपूर, जयपूर, भरतपूर, उदेपूर इतक्या ठिकाणीं जाण्यास शाहूस वेळ कसा मिळाला असेल कोण जाणें ? कदाचित् हे राजे अगर त्यांचे वकील बादशहाबरोबर असतील त्यांणीं शाहू महाराजांस मेजवान्या केल्या असाव्या. एका ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, एकंदर ३४ दिवस शाहूस मेजवान्या होत होत्या.

४२. कसाला=फार त्रास, अति श्रम.

४३. काफीखान म्हणतो झुल्फकारखान यांणीं शाहूची सुटका करून दिल्यावर तो ५०/६० माणसांनिशीं बिजागड सुलतानपूर व नंदूरबार येथील बंडखोर जमीनदार जो मोहनसिंग याजकडे प्रथम गेला. त्याणें शाहूस थोडीशी युद्ध सामुग्री दिली. नंतर तापीच्या कांठच्या कोकरमंड (?) किल्ल्याचा धनी अंबपांडे याजकडे शाहू गेला. हा अंबूजी सुरतेपासून तों बऱ्हाणपुरापर्यंत सर्व मुलखाची नासधूस उडवीत असे. याणें शाहूबरोबर बरीच फौज देऊन त्यास स्वदेशीं पाठविलें.

४४. कलमजारी—भरती.

सबनीस यांणीं बराबर बहुत श्रमसेवा केली. त्यांजवर कृपा करून फौजेचीं बक्षीगिरीचीं वस्त्रें दिल्हीं. जोत्याजी केसरकर यास सरदेशमुखीची मुतालकी वतनी करून अजहत सरदेशमुख म्हणून देऊन सरखेवाशी व देहुड्यांकडील चौकी पहारे व कारखाने यांस हवाले देखरेख त्यांजकडे सांगितली. परसोजी भोंसले यांजकडे सेनासाहेब सुभा होता, त्याचीं वस्त्रें बहुमान देऊन वराड, गोंडवण सुभा कायम केला. चिमणाजी दामोदर यांसि चिमणाजी पंडित ऐसा किताब, बहुमान, सरदारीचीं वस्त्रें दिलीं. हैबतराव निंबाळकर व नेमाजी शिंदे व सयाजी भोंसले जाऊन भेटले. त्यांचे बहुमान करून हैबतराव निंबाळकर मर्द माणूस पाहून सरलष्कर किताब देऊन सरदारी वस्त्रें जरीपटका साहेबनौबत, बहुमान दिल्हा. आनंदराव महादेव खासनवीस हे भोंसले यांजपाशीं होते. त्यांस खासनिशी व पोतनिशीचे दरख पूर्वी त्यांचे चुलते यांजकडे होते ते कायम करून यांस वस्त्रें दिलीं.

या नंतर गंगा उतरून आलीकडे आले. आणि ताराबाई साहेब व त्यांचे पुत्र शिवाजी राजे, प्रधान व अमात्य रामचंद्रपंत वगैरे मुत्सद्दी सचिव चिटणीस यांस पत्रें पाठविलीं जे, "आम्ही पादशहापासून निघोन मुक्कामास येऊन पावलों. लौकरच येतों." हें वर्तमान समजोन व पत्रें पाहून ताराबाई साहेब यांणीं दुर्बुद्धि धरिली जे, "संभाजी राजे वडील त्यांचे पुत्र हे राज्याचे अधिकारी आले. त्यांचे आज्ञेंत चालावें लागेल. आपले पुत्रास राज्य देऊन शिक्के करून आजपर्यंत चालविलें. आपले भ्रतार यांणीं आजपर्यंत श्रम साहस करून राज्य रक्षिलें. त्यास आपले पुत्र व आपण राज्य करावें. पूर्वी एक वेळ तोतिया शाहू राजा होऊन आला, त्यास मारिलें. तसेच हेही म्हणून फौजा पाठवून त्यांचें पारपत्य करावें, धरावें, मारावें." ऐसा हेतु धरून सर्व सरदार, मुत्सद्दी प्रधान मेळवून विचार करतीं जालीं. त्यांत रामचंद्रपंत अमात्य व परशराम त्रिंबक प्रतिनिधि हे मुख्य [ होते त्यांस ] व संकराजी नारायण सचिव, निळकंठ मोरेश्वर प्रधान व तिमाजी रघुनाथ हणमंते व धनाजी जाधवराव सेनापति व खंडो बल्लाळ चिटणीस इत्यादिकांस आपला मनोदय सांगितला. "तुम्हांस सर्वांस इतराजी करून संभाजी राजे यांणीं सर्वांचीं पारपत्यें निरापराधी केलीं. राज्य गमाविलें. दौलत, हत्ती, घोडे, पागा, खजीना सर्व गमाविलें. राजाराम साहेब यांणीं पुढें चंदीस जाऊन, तुम्हां सर्वांस वाढवून, श्रम करून राज्य सोडविलें. वास्तव त्यांचे पुत्र शिवाजी राजे यांस अंतर न देतां फौज

४५. सरखवास=अनुचरांतील मुख्य.

४६. खाननीस=खासगीकडील कारभारी. पोतनीस=बरोबर द्रव्याचा हिशेब ठेवणारा अधिकारी. दरख=काम, अधिकार.

४७. गंगा=गोदावरी.

४८. हा सन इसवी १७१२ मध्यें मरण पावला असें ग्रांट डफ म्हणतात. पुढें टीप ६८ पहा.

घेऊन खरे किंवा खोटे शाहूराजे असोत त्यांशीं लढावें, धरावें, ऐशी शफत करोन मसलत करावी." म्हणून शफता घेतल्या. हें वर्तमान शाहू महाराज यांसही समजलें. यावरून गंगातीरींच मुक्काम करून राहिले. अष्ट प्रधान व सरदार यांणीं कारकून पाठवून शोध नेले, तों शाहू महाराज खरे. व बराबरची मंडळी सबनीस वगैरे व केसरकर आले [ ते ही ] खरे. असें समजोन सर्वांस बहुत विचार पडले. यानंतर सर्व फौज वगैरे तयारी आईसाहेबीं करून, दूधभातावें ताट भरून ठेवून "सर्वांनीं क्रियां द्यावी. आणि फौज घेऊन पुढें जावें," सांगितलें. तेव्हां रामचंद्रपंत व परशरामपंत यांणीं क्रिया दिली जे "आम्ही मसलत करितों." बहुत दुराग्रह आईसाहेबीं धरून सुभे व किल्ले यांस पत्रें पाठविलीं "किल्ले देऊं नयेत, कोणी जाऊन भेटूं नये, खर्चास मुलकांतील वसूल देऊं नये." याप्रमाणें करून किलियास नवीं सामानें दारू गोळा केला. किल्ल्यावर आपले विश्वासू लोक कारकून वगैरे रवाना केले. आणि विचार ठरविला जे, अमात्य यांणीं जवळ राहून सर्व मसलत राजकारण संभाळावें. सेनापति व प्रतिनिधि यांणीं फौज घेऊन लढाईस जावें. सचिव व प्रधान यांणीं आपले किल्ले तालुके संभाळून आपले लोक कुमकेस पाठवीत असावें. कान्होजी आंगरे यांस आणोन त्यांचेंही इमान घेतलें. त्यांनीं कोंकण प्रांत किल्ले जंजिरे सर्व राखावे. तिकडे मिळों नये [ असें केलें. ] सर्वांस मेजवानी करून दूतभातावर हात ठेवावे असें सांगितलेंवरून सर्वांनीं क्रिया दिल्या. ते समयीं सेनापतीनें सांगितलें, "आपले जीवाभ्य श्रम करून जाऊन एक लढाई देऊं." असें म्हणून हात ठेविला. आणि "मजला जाण्याची आज्ञा; त्यास खंडो बल्लाळ चिटणीस विश्वासू, सर्व माहीतगार, यांस आपले बराबर द्यावें" [ असा ] आड घातला. तेव्हां यांसही "तुम्ही ताटावर हात ठेवून क्रिया करणें" म्हणून सांगितलें. ते समयीं "मी लिहिणार, हे सरदार, यांचे लक्षांत राहून हे सांगतील तितकें लेहून यांचे विचारें चालेन. आम्हांस स्वामींचे पायावांचून दुसरा विचार नाहीं. हात ठेवणें त्यांहून विशेष काय ? आम्ही महाराजांचे पायांवितरिक्त दुसरें जाणत नाहीं." असें सांगितलें. यावरून त्यांस बरोबर दिल्हें. प्रतिनिधि व सेनापति सुमुहूर्तें वस्त्रे देऊन रवाना केलें. ते निघोन डेरां दाखल झाले. खंडो बल्लाळही गेले. परंतु खंडो बल्लाळ यांनीं क्रिया दिल्ही नाहीं असें चित्तांत येऊन, पुन्हा येऊन जावें असें सांगून पाठविलें असतां त्यांनीं सांगितलें कीं, "मी आज्ञा घेऊन सुमुहूर्तें निघोन आलों. महाराजांचे पायांखेरीज दुसरें जाणत नाहीं. अशी शफतही दिली आहेच." अशी विनंती सांगून पाठविली.

---

४९ क्रिया=शपथ.
५०. जीवाभ्य=जीवादारभ्य=शक्ति असेल तितकी खर्चून, मनापासून.

हें वर्तमान शाहू महाराजांस समजलें. " आईसाहेबीं दुर्बुद्धि धरिली. यांस सर्व प्रधान सरदार लोक किल्ले कोट अनुकूळ होऊन मसलत आरंभिली. आपणांशीं लढाई देणार. " " बरें. थोरले शिवाजी महाराज यांचा आशीर्वाद व त्यांचे पायांचा प्रताप श्रीभवानी व श्रीसांब इतके रक्षण करून त्यांनींच हे दिवस दाखविले. राज्याचे अधिकारी आपण, आपणास रक्षणें असेल तसें रक्षितील. " म्हणून कूच करून पुढें निघाले. ते शिवणेरें परगण्यांत आले. तेथें पारद म्हणून गांवगढी होती. त्यांनीं महाराजांस न भेटतां स्वार व रोखा गेला त्याजबराबर गोळी वाजविली. यावरून खासा स्वारी करून सिवार लुटविला. वेढा घालून तोफा लाविल्या. हल्ला करून गढी गांव घेऊन लुटून पाटील व लोक मारविले. त्या समयीं एक पाटलाची स्त्री इणें मूल घेऊन येऊन, महाराजांचे पालखीपाशीं येऊन पालखींत टाकिलें जे, " यास वांचवावें. अन्यायी होते ते मारले गेले. हें मूल आपणांस वाहिलें आहे " बोलली. ठाणें फत्ते झालें ते समयीं त्या मुलाचें नांव फत्तेसिंग भोंसले असें ठेविलें. त्याचे आईस आश्वासन देऊन मारणें व लूट बंद करवून, कौल देऊन वसाहत करणेस सांगून मुक्कामास आले. याप्रमाणें दरकूच खेड कडूस [ नजीक ] येऊन पोंचले.

[ इकडे ] प्रतिनिधि व सेनापति चाळीस हजार फौज घेऊन पुढें मोकाबल्यास गेले. महाराजांपाशीं वीस पंचवीस हजार फौज जथली. लढाईचा निश्चय जाला. ते समयीं सेनापतींनीं निश्चय मनांत केला, " शाहू महाराज आले हे राज्याचे तख्ताचे अधिकारी खरे. आपणांस आईसाहेबीं लढाईविशीं इमान घेतलें. त्यास खंडो बल्लाळ चिटणीस पुरातन यख्त्यार, थोरले महाराजांपासून विश्वासू, जवळचे कारभारी, यांस पाठवून पक्केपणीं शोध करावा. व आपलें वर्तमान प्रसंग सर्व विदित करावें. बरोबरचे मंडळींची व महाराजांची भेट घेऊन तेथील वर्तमान सत्य मिथ्या वगैरे घेऊन त्यांनीं यावें. त्याप्रमाणें पुढील मनसबा विचार करावा. " म्हणोन खंडो बल्लाळ यांसि बोलोन जावें असें सांगितलें. तेव्हां प्रतिनिधि निःसीम लढाईचा इरादा व मनसबा करून आहेत, तेंव्हां गुप्तरूपें जावें असें केलें. खंडो बल्लाळ हे दुसरा वेश धरून गेले. आणि महाराजांस भेटून सर्व मंडळीस भेटले. इकडील सर्व वर्तमान सांगितलें. तिकडील ऐकून घेतलें. महाराज खरे हें पाहून राजकारण व सेनापतीचा व जे जे सरदार सेनापतींच्या विचारांत त्यांचे सर्व मजकूर समजावून सेनापतींस निरोप व पत्र खुणेचें घेऊन आले. आणि फौजेंतील सरदार यांचे भेद करून

५१. चिटणीस प्रत ' शिवणें '
५२ रोखा=मागणेचिठ्ठी, वरात.
५३. त्याजबराबर गोळी वाजविली=त्याजवर गोळी सोडली, त्याशीं दंडेली केली, त्यास अमान्य केलें.
५४. सिवार=शिवार=गांवाखालच्या जमीनी, शेतें वगैरे.

सर्वांस कळलें कीं, चिटणीस जाऊन आले. महाराज खरे. एक लढाई करावी. तें कपटयुद्ध करावें. ऐसें ठरावून सर्वांचे इमानप्रमाण घेऊन एक विचार बहुत करून, भेद करून, पुन्हा महाराजांकडे खंडो बल्लाळ चिटणीस गेले. सर्व राजकारण विदित केलें आणि सेनापतींपाशीं आले. महाराजांनीं हत्तीचे पायीं अंदु घालून लढावयाचें म्हणून सिद्ध होऊन बख्तर व टोप घालून हौद्यांत बसोन, धनुष्यबाण हातीं घेऊन, ढाल तरवार बांधून युद्धास उभे राहिले. सेनापति व प्रतिनिधि सिद्ध होऊन लढाईस गेले. लढाईस प्रारंभ जाला. प्रतिनिधि व आईसाहेबांचे लग्याचे सरदार बहुत लढले. तिकडून परसोजी भोंसले [ व ] चिमणाजी दामोदर यांणीं घोडे चालवून लढाई केली. त्यांत महाराजांनीं हत्ती चालवून तिरंदाजी केली. फौजेंत मिसळले. दहा हजार फौज धारकरी निवडून महाराजांनीं चालून घेतलें. सेनापति हे आपले घोड्यापर्यंत महाराजांचा हत्ती येईपर्यंत उभे राहिले. प्रतिनिधि वगैरे फौज मोड होऊन पळूं लागले. तेव्हां सेनापतींनीं आपले विचारांतील सर्व सरदार घेऊन, घोड्यावरून उतरोन, मुजरे नजर करून भेटले. महाराज तेथेंच मुक्काम खेडचे मैदानीं करून राहिले. सेनापतींनीं आपली फौज एकवटून तीनें कोशांचे अंतरे आज्ञा घेऊन जाऊन उतरले. ते भीमातीरीं राहिले. याप्रमाणें लढाई मुक्काम मजकुरीं शके १६२९ सर्वजित् संवत्सरे सन समान मया व अलफ सालीं होऊन महाराज विजयी जहाले. लोकांनीं कामें केलीं त्यास बहुमान बक्षीस दिल्हें. समाचार घेऊन जखमा बांधविल्या. प्रतिनिधि पळोन सातारियास येऊन किल्लेचा बंदोबस्त करून राहिले. आणि सर्व वर्तमान आईसाहेबांस लेहून पाठविलें. त्यावरून त्यांणीं पन्हाळा वगैरे सर्व किलियांस हुशारी करवून, आणखी फौज लोक जमा करावयासि लागलीं. लढाई जहालियावरि दुसरे दिवशीं सेनापति यांणीं खंडो बल्लाळ यांस बोलावून नेऊन, महाराजांस विनंति करून, फौज व सरदार यांच्या भेटी व्हावयाचेविशीं विनंति करावी म्हणून सांगून पाठविलें. त्यांणीं जाऊन भेटीचा सिद्धांत केला. मध्यें डेरे होऊन महाराज पुढें जाऊन सर्वांचा सन्मान करून भेटी जाहल्या. नजरा होऊन सर्वांस यथायोग्य चादरी व शेले घातले. आपलाले मिसळीसें उतरावें आज्ञा केली. यानंतर मुहूर्तेंकरून सेनापतींस पदाचीं वस्त्रें बहुमान पद्धतीप्रमाणें हत्ती, घोडे जवाहीर दिल्हें. खंडो

५५. बख्तर=कवच, चिलखत. टोप=शिरस्त्राण.

५६. धारकरी=तरवार बहादर, शस्त्रास्त्र कुशल वीर.

५७. चालून घेणें=हल्ला करणें=अंगावर पडणें.

५८. 'तीस' असें चिटणीस प्रतींत आहे तें चुकीचें होय.

५९. मिसळीस–योग्य स्थळीं, ज्याचा ज्या आंगीं उतरण्याचा परिपाठ त्या आंगीं कोणी मागें कोणी उजवे आंगीं, कोणी आघाडीस इत्यादि.

बल्लाळ यांस चिटणिशींचीं वस्त्रें, कमलदान, शीरपेंच, कंठी, चौकडा दिल्हा. आणि सरदार वगैरे यांस सरदारी वस्त्रें बहुमान दिल्हे.

यानंतर कूच करून पुण्यास आले. रोखेपत्र आज स्वारी शाहू महाराज असे प्रांतांत करविले. पुण्याहून कूच करून, श्रीजेजुरीस येऊन, देवदर्शन करून, तेथें देवाची पूजा ब्राह्मणभोजन बहुत करून दानधर्म केला. देवास वस्त्रें, जवाहीर देऊन हत्तीवर घालून भंडार खोबरें उधळले[६०]. जेजुरीचे मुक्कामाहून संक्राजी नारायण सचिव, दत्ताजी शिवदेव राजाज्ञा यांस भेटीस येण्याविशीं पत्रें पाठविलीं. राजाज्ञा येऊन भेटले. त्यांस पदाचीं वस्त्रें दिलीं. सचिव यांणीं विचार केला जे, "आपण आईसाहेबांस इमान देऊन दूधभातावर हात ठेविला. तें सोडून जाऊन भेटावें तरि क्रियाभ्रष्टपणा येतो. न जावें तर हरामखोर व्हावें." म्हणून राजगडींच जाऊन राहिले. याउपरि जीवित्व ठेवणें ठीक नाहीं असा विचार[६१] केला. महाराज वीरास कुलस्वामी सिद्धे[६२] यांचें दर्शन घेऊन पुढें येऊन चंदन वंदन नजीक दहीगांव येथें वांई प्रांतीं येऊन मुक्काम केला. चंदन वंदनचे हवालदार, सुभेदार यांस पत्रें पाठविलीं. ते येऊन भेटले. त्यांस सर्फराज[६३] केलें. किल्ले घेतले. सातारियास पत्रें व प्रतिनिधींस पत्रें पाठविलीं. तेथें प्रतिनिधींनीं लढाई देण्याची तयारी केली. शेखमिरा वांईकर जमातदार लोक सुद्धां सातारियावरि होते व प्रयागजी प्रभु सुभेदार व कारखानीस, हवालदार यांस पत्रें पाठविलीं असतां भेटीस न येत. तेव्हां शेखमिऱ्यांचे कबिले वांईहून धरून आणिले. व लोक किल्यावरील यांचे कबिले धरून आणून मोर्च्यास पुढें करून हल्ला करावीसें केलें. भेदही करविला. हवालदार, सुभेदार व शेखमिरा व लोक यांणीं प्रतिनिधींस सांगितले, "आमचे कबिले धरिले व महाराज राज्याचे खावंद त्यांस किल्ला देऊन भेटावें." ते गोष्ट ते न ऐकत. तेव्हां सर्वांनीं एक विचार करून, महाराजांकडे राजकारण पाठवून, आमची तरवार किल्ल्यावर झळकली म्हणजे महाराजांनीं चालून यावें, ऐसें केलें. आणि प्रतिनिधींस कैद केलें. त्यांजकडील लोक खालीं घालविले. तरवारीची बातमी वंदनावरून ठेविली होती. चमकतांच महाराज चालून गेले. सातारा हस्तगत झाला[६४]. सुभेदार व शेखमिरा व हवलदार येऊन भेटले. त्यांचा सन्मान करून बक्षीस देऊन त्यांचीं कामें

---

६०. याचप्रमाणें खेडच्या लढाईच्या पूर्वी अहमदनगराजवळ असतां शाहूनें औरंगजेबाच्या थडग्याचे दर्शनास जाऊन मोठा दानधर्म केला, असें खाफीखान लिहितो. त्याचें वर्णन या बखरींत नाहीं.

६१. यांणीं पुढें जलसमाधी घेतली.

६२. 'सिद्ध' असा सर्व प्रतींचा पाठ आहे. हा कुलस्वामी कोण? वीर येथें म्हसकोबाचें स्थान आहे.

६३. सर्फराजी=ऊर्जित, पोषाख व दरख देऊन सन्मान करणें.

६४. या पूर्वी बरेच दिवस शाहूला सातान्याभोंवतीं वेढा देऊन बसावें लागलें होतें.

त्यांजकडे ठेविलीं. प्रतिनिधि कैदेंत तेथेंच ठेवून, त्यांचा बंदोबस्त बहुत योग्य. तेचा नित्य खर्चास पाहिजे तें द्यावें ऐसें करून ठेविलें. वरकड किल्ले परळी, वर्धनगड, महिमानगड वगैरे सर्व घेतले. त्यांस हवालदार दरखदार नवे जुने करार करून लोक वगैरे सांप्रदायाप्रमाणें सनदा करून दिल्या. व वंदन नजीक छावणी केली. दरखदार नवे जुने बदली करून शिरस्तेप्रमाणें लोक वगैरे [ यांचा ] बंदोबस्त केला.

या नंतर शके १६२९ सर्वजित् संवत्सरे सन समान मया व अलफ माघ शुद्ध पक्षीं सातारेस येऊन, उत्तम मुहूर्त पाहून, राज्याभिषेक सिंहासन करून व्रतबंधपूर्वक समारंभ विधिपूर्वक केला. दानधर्म ब्राह्मणभोजन बहुत केलें. अष्टप्रधान जे जे आले त्यांस यथापद्धति पदार्चीं वस्त्रें देऊन कार्यें सांगितलीं. पूर्व मर्यादेप्रमाणें स्वस्तिश्रीचीं पत्रें लिहिण्यास प्रारंभ करून शिक्के आपले नांवाचे करून राज्य चालवूं लागले.

यानंतर श्रीरामदास स्वामींची सर्व शिष्यमंडळी आकाबाई-प्रमुख मठाची व श्रीची पूजा चालवून होती. त्यांणीं अधिकारी कोण करावें [ म्हणून ] डोंबगांवकर व सर्व संस्थानी मिळाले. शिष्यसंप्रदाय [ चालवावा ] किंवा वंश श्रेष्ठाचे* पुत्र आहेत, श्रीस्वामींची आज्ञा त्यांस आणावें, संस्थान त्यांणीं चालवावें, अशी आज्ञा जाली होती; [ परंतु ] सर्वांस दुराशा आपण व्हावें ऐशी, यावरून महाराजांस विचारिलें. तेव्हां " सर्वांनीं समाधीपाशीं जमावें " हें सांगितलें व गंगाधर स्वामी श्रेष्ठ, स्वामींचे वडील बंधु रामीरामदास, यांचे नातु यांस आणविलें. ते माहुलीस आले. त्यांस सामोरे जाऊन, अंबारींत बसवून, सातारेस आणोन परळीस जाणेस सांगितलें. तेथें सर्व रामदासी संस्थानी मिळाले. महाराजही परळीस गेले. तेथें सर्वही आसनें गाद्या टाकून मोठे मोठे योग्य शिष्य मंडळी स्वामींचे होते ते बसले. महाराज मंडपांत गेले. तों सर्वही आसनें घालोन बसले आहेत. तेव्हां उभे राहून, गंगाधर स्वामीही बसले होते, त्यांस आसनें सर्वांनीं आपलीं काढून साष्टांग नमस्कार करावे सांगितलें. सर्वांपासून करवून आपण साष्टांग नमस्कार केला. आणि मेखला, शालजोडी वस्त्रें दिलीं. श्रीरामचंद्रजीस व समाधीस दर्शन पूजा वस्त्रें जवाहीर करून गंगाधर स्वामींचे आज्ञेत चालावें सांगितलें, त्यांजकडील गांव जमिनी वर्षासनें [ यांचीं ] पत्रें त्यांचे नांवें करून देऊन चालविलें. आधिपत्य गंगाधरस्वामींस देऊन गादीवर बसविलें. शिवाजी महाराज यांजपासून चाललें तसेंच चालेल असें सांगितलें.

इकडे आईसाहेब [यांणीं] व शिवाजीराजे संभाजीराजे होते यांसह विचार केला [कीं आतां] पन्हाळ्यास राहूं नये. रांगणा बिकट जागा तेथें रहावें. म्हणून जाऊन राहिलीं.

---

* श्रेष्ठ=रामदासाचा वडील भाऊ गंगाधर स्वामी.

महाराज कूच करून पन्हाळा प्रांतीं जावयास निघाले. मार्गीं वसंतगड वगैरे घेतले. पन्हाळेस जाऊन मोर्चे लावून पन्हाळे व पावनगड दोन्ही घेतले. कोल्हापुरीं ठाणें बसवून प्रांत अंमल बसवून रांगण्यावर गेले. ते समयीं आईसाहेबांस तेथें दम न निघे. यामुळें दोघे पुत्रसह रामचंद्रपंत अमात्यसुद्धां मालवणास निघोन गेलीं. महाराजांनीं रांगणेस मोर्चे लाविले. तेव्हां आईसाहेब यांणीं खेम सावंत वाडीकर यांशीं राजकारण करून आणि आपली कुमक करून लक्षांत वागावेंसें केलें. आणि कान्होजी आंगरे यांसि " तुम्हांस सरखेल पद सुभा कोंकण राजाराम साहेबीं दिल्हें, [ तेव्हां ] तुम्हीं या लक्षांत वागावें, " ऐसें इमान घेऊन त्यांचे लोक कुमकेस दोहींकडील आणोन रांगण्याचे मोर्चे मारावे वगैरे करूं लागलीं. तेव्हां महाराजांनीं विचार केला जे, " हल्ला करून किल्ला घ्यावा. " म्हणून जातीनें हल्ले बरोबर घोडा चालविला. किल्यावर चढले. चालले. तों डोंगरांत घोड्याचा पाय घसरला. तेव्हां जवळ शेखमिरा व खंडो बल्लाळ चिटणीस चालले होते. ते समयीं चिटणीस यांणीं झाडास पाय§ देऊन घोडा ओढून धरिला. शेखमिरा यांणीं महाराजांस जलदी करून उतरून घेतलें. यावरून उभयतांवर महाराज बहुत संतोषी होऊन वस्त्रें, मोत्यांचे तुरे व कंठ्या दिल्ह्या. चिटणीस यांस पन्हाळ प्रांतींचें नाडगौंडीचें वतन पांच हजार रुपयांचें इनाम करून देऊन, शेखमिरास सरंजाम गांव इनाम कांहीं दिला. हल्ला तकूब झाली. मोर्चे कायम ठेविले. पुढें पर्जन्यकाल आला याजवरून करवीर पन्हाळा येथें छावणीस आले. विशाळगड तालुका खंडो बल्लाळ यांचे बंधु निळो बल्लाळ यांजकडे होता त्यांस पत्रें गेलीं. ते येऊन भेटले. त्यांजकडेच सुभा सांगून तालुका ठेविला. त्या प्रांताचा बंदोबस्त करून महाराज सातारेस आले. चंदन वंदन खालीं छावणी केली. येतां धनाजी जाधवराव सेनापति वृद्ध होते, त्यांचे पायास जखमेचा व्रण होता, तें [ दुखणें ] अधिक जालें. वडगांव वारणेतीरीं आहे तेथें वारले. शके १६३२.

यानंतर या समयांत बाळाजी विश्वनाथ, उपनांव भट, श्रीवर्धन येथील देशमुख, हे हबशी याचें वांकडे येऊन पेंच आला म्हणून कुटुंबसुद्धां देशीं येऊन सासवड येथें राहिले. तेथें अंबाजीपंत* पुरंदरे देशपांड्ये होते. त्यांचा यांचा स्नेह जाला. बाळाजी विश्वनाथ व पुरंदरे मिळोन जाधवराव सेनापति

---

§ किंवा ' पाठ ' ही होईल.

६५. नाडगौन्डीचें वतन–हें शेंकडा ३ रुपयाप्रमाणें मिळे. हें पाहिजे त्यास राजानें द्यावें असें होतें. पेशव्यांची बखर आवृत्ति तिसरी पृष्ठ १६ टीप ३३ पहा.

६६. ' कुळकर्णी ' चिटणीस प्रत.

* ज्यांस ' आबाजी पुरंदरे ' म्हणतात ते. पुढें टीप ७५ पहा.

यांजकडील बाबतीच्या मामलती मक्त्यांनीं करून मोंगलाईतील हजार पांचशें स्वार बाळगून होते.

[ इकडे ] महाराज सातारेस आलियावरि आईसाहेब आणखी जमाव करून रांगण्यास आलीं. आणि पन्हाळा येथील हवलदार त्यांजकडील होते तेच महाराजांनीं कायम ठेविले होते, त्यांशीं भेद करून पन्हाळा घेतला. पन्हाळियासि आलीं. शके १६३३ खरनाम संवत्सरे इसन्ने अशर मया व अलफ. यांत आईसाहेबांचे पुत्र शिवाजी राजे यांस काळ्या फोड्या येऊन वारले. धाकटी बाई राजसबाई व त्यांचे पुत्र संभाजी राजे गादीवर बसवून कारभार करूं लागली. त्यांणीं ताराबाई साहेब यांस नजरबंद केलें. त्या समयीं ताराबाईचे [ पुत्र ] शिवाजी राजे वारले, त्यांची स्त्री भवानीबाई तीन महिन्यांची गरोदर होती ती नऊ महिने पूर्ण होऊन प्रसूत जाहली. पुत्र जाहला. रामराजे नांव ठेविलें. शके १६३४. त्याचा घात करावा अशी बुद्धि राजसबाई यांस होऊन प्रयत्न करूं लागलीं. हें आढळलियावरून मूल वारलें असें करून भगवंतराव रामचंद्र अमात्य यांचे अनुमतें दाई व कांहीं माणसें देऊन बावड्यांत त्यांचे वाड्यांत कांहीं दिवस [ त्यांस ठेविलें. ]

शाहू महाराज यांणीं जाधवराव वारले त्यांचे पुत्र चंद्रसेन जाधवराव यांस सेनापतिपद देऊन बहुमान यथापद्धति वस्त्रें जरीपटका दिला. परशरामपंत प्रतिनिधि कैद केले. प्रतिनिधिपद गदाधर प्रल्हाद नाशिककर यांस दिल्हें. हे यवनापासून मार्गीं येतां कामास आले होते. म्हणून सर्फराजी केली. कांहीं दिवस [ काम ] केलें. नंतर परशरामपंत यांणीं सरकार लक्षांनीं वागावें ऐशी निखालसता केली. मोठे कार्यकर्ते जाणोन कैदेंतून मुक्तता करून त्यांचें प्रतिनिधिपद देऊन वस्त्रें बहुमान देऊन दिल्हें. आपलेसे केले. कृष्णाजी जोशी नाईक माळव्यांतून येतां सेवा चाकरीचे उपयोगीं पडले, याजवरून पोतदारी पुंडे[७०]

---

६७. बाबत—हक्क, अंमल.

६८. मागें टीप ४८ व थोरले राजाराम महाराज यांचें चरित्र पृष्ठ ७४ टीप ३० आवृत्ति दुसरी पहा. राजाराम यांचे चरित्रांत दोन्ही प्रतींत दिलेले शक चुकीचे आहेत. ( चिटणीस प्रत १६२८ व इंदूर प्रत १६४२ ) तेव्हां शिवाजी—याला वेडा शिवाजी म्हणत असत—हा शके १६३३ मध्यें मरण पावला. ग्रांड डफ १७१२ हा इसवी सन देतात तोही बरोबरच आहे.

६९. " रामचंद्रपंत अमात्य " चिटणीस प्रत. भगवंतराव हा रामचंद्रपंताचा पुत्र असावा. ग्रांड डफ चिटणीस प्रतीचेंच अनुसरण करितात.

७०. पुंडे—शहाजीचा बाप मालोजी यांस देवीनें दृष्टांत दिल्याप्रमाणें वारुळांत द्रव्य अगणित सांपडलें तें देवीच्या सांगण्यावरून श्रीगोंदेकर शेषापा नाईक पुंडे यांजकडे ठेविलें. तेव्हां नाईक यांणीं मालोजी यांस मेजवानी करून विनंति केली कीं, " तुम्हांस श्रीनीं द्रव्य दिलें तेव्हां भाग्योदय तुमचा दिसतो. उत्तम आहे. तुम्हांस दौलत राज्य प्राप्त जाहलियास तुमची पोतदारी

( पुढें चालू. )

चाभारगोंदेकर यांस पूर्वापार होती, परंतु ते ताराबाईकडे राहिले यावरून यांस दिल्ही. नीळकंठ मोरेश्वर पिंगळे प्रधान यांणीं इमान आईसाहेबांस दिल्हें म्हणून रांगणा मालवणाकडे गेले. तिकडे वारले. त्यांचे कनिष्ठ बंधु बहिरव मोरेश्वर महाराजांस येऊन भेटले. यावरून मुख्य-प्रधान-पद बहुमान वस्त्रें देऊन दिल्हें. त्यांचा प्रांत कल्याण, जुन्नर, राजमाची वगैरे तालुका ताबियांत त्यांजकडे दिल्हा. रायगड हबसी याजकडून सुटला नाहीं. कोंकण बिकट जागा. हवा मानावयाची नाहीं. राजगड ही मावळ हवा. याजकारितां सातारा येथें कृष्णातीरीं व देश रहावयास योग्य जाणून साताराच रहावयास जागा करावी, म्हणून किल्ला नजीक शाहू-नगर ऐसें नांव ठेवून वस्ती करविली. पेंठा वगैरे करण्यास कौल देऊन, शनवार, गुरुवार अशा दोन पेंठा वाडानजीक करून, रहाणेस महाल रंगमहाल व धाकटे राणीचा महाल ऐसें करवून राजधानी केली. सावित्रीबाई राणी ही वारली. म्हणून दोन लग्नें आणखी करावींसें करून कुवारजी शिर्के यांची कन्या प्रथम केली. त्यांचें नांव सकवारबाई साहेब ठेविलें. दुसरी मोहिते यांची कन्या केली. त्यांचें ७१सगुणाबाई साहेब ठेविलें, आणि मुख्यत्वें विरूबाईकडे कृपा ठेवून राण्या लहान त्यांणीं विरूबाई सांगतील तसें चालावेंसें केलें. रामचंद्र नीळकंठ अमात्य आईसाहेब संभाजी राजे यांजकडे इमान दिल्हें याजमुळें तिकडेच राहून त्यांचे मसलतींत राहिले. तिमाजी रघुनाथ हणमंतेही तिकडेच इमान गुंतलेमुळें राहिले. त्यांचे बंधु अंबुराव व बाबुराव हणमंते येऊन भेटले. अगोदर कांहीं दिवस गदाधर भट यांस अमात्य-पद दिल्हें [ होतें ] हे भेटलेवर प्राचीन व वडिलोपार्जित हे जाणोन अमात्य-पद बहुमान देऊन अंबुराव यांस दिल्हें. संक्राजी नारायण सचिव यांस महाराजांनीं भेटीस येणें [ म्हणून ] पत्रें पाठविलीं होतीं. तेव्हां आईसाहेबांस इमान दिल्हें याजमुळें गेलें असतां क्रियाभ्रष्टता होती व महाराज धणी तख्ताचे व खावंद, न गेलें तरी हरामखोरी येती. असें दोन्हीकडून संकट जाणोन आले नाहींत. यानंतर महाराजांनीं बोलावण्यास कांहीं फौज रवाना केली. त्यांचे स्वाधीन राजगड करून आपण अंबवडे येथें नागनाथ तीर्थ आहे तेथें संन्यासग्रहण [ करून ] देहत्याग करावासा विचार करून, विष हिरकणी घेऊन, संन्यास-ग्रहण केलें. आणि जळसमाधि करून देहत्याग केला. शके १६३४

---

(मागिल पृष्ठावरून.)
वतनी आम्हांस परंपरागत करून द्यावी." त्याप्रमाणें मान्य करून परस्पर आण शपथ झाली. पुढें शिवाजी राजे यांणीं राज्यसंपादन केल्यावर पूर्व स्मरून [illegible]

७१. 'गुणाबाई' असें चिटणीस प्रतींत आहे तें चुकीनें पडलें असावें. ह्या सगुणाबाईवर शाहूचें प्रेम फार असे असें धावडशीच्या स्वामींच्या चारित्रावरून व पुढील मजकुरावरून स्पष्ट होतें.

नंदननाम संवत्सरे सल्लास अशर मया व अलफ. हे वर्तमान महाराजांस श्रुत जाहलें. आश्चर्य मानून त्यांचे पुत्र नारो शंकर दोन वर्षांचे पाळण्यांत होते, त्यांस बहुमान वस्त्रें सचिव-पदाचीं पाठविलीं. रामेकर त्यांचे मुतालीक कारभारी होते त्यांस मुतालकीचीं वस्त्रें देऊन त्यांचे हातें दरख व कामें सेवा घेतली. पन्हाळा रांगणा मालवण वगैरे इलाखे मात्र संभाजी राजे यांजकडे ते समयीं राहिले. बंधुच आहेत, आग्रह करून कशास घ्यावे, म्हणून राखिले. वरकड प्रांत किल्ले यांचा बंदोबस्त केला. जे जे अष्टप्रधान, दरकदार, कारखानदार येऊन निष्ठेनें राहिले त्यांचे अधिकार त्यांस देऊन चालविले. सरदार, पदाधिकारी, मरातबदार आले त्यांचे मरातब सरंजाम सरदाऱ्या त्यांच्या त्यांजकडे चालविलें. वडील असोन आईसाहेबांकडे राहिले आणि धाकटे येऊन सेवा केली, त्यांस धाकट्यांसच पदें, दरख दिल्हे. सर्वांचे सन्मान करून आपले लक्षीं लाविलें. येवतेश्वराहून नहर बांधून शहरास व वाड्यांत पाणी खर्चास नाहीं म्हणून बांधून आणून पाणी केलें. सर्व मनुष्यमात्रास कृपा ममता लावून वेध लाविला. सर्वांस वाटावें कीं, आपले इतकी कृपा कोणावर नाहीं. तैनाता, नेमणुका, जमिनी इनाम गांव ज्याचे जसे श्रम साहस सेवा त्याप्रमाणें बक्षीस द्यावीं. ज्याच्यापासून ज्या कामाचा उपयोग त्यांत एकादा अवगुण आहे तरि युक्तीनें झांकून त्याजपासून सोडवावा. गुण तितका प्रगट करून घ्यावा. माणसें वाढवावीं. याप्रमाणें राज्याचा उदयकाल, वृद्धि व्हावयाची, हें समजोन पूर्वी वडिलांनीं सर्व माणसें दुखविलीं, मारलीं, कारखाने बुडविले, त्यायोगें राज्यनाश जाहला. उग्र दंड, ब्रह्महत्त्या जाल्यावरून देव ब्राह्मण यांचे ठायीं बहुत निष्ठा. त्यांचीं वर्षासनें संगोपन यथास्थित करून माणसांचा गुण ग्रहणच बहुत केला. आपलेसे करून वेधास लाविले. प्रौढ माणसें सर्वकाल सहवासास असावीं, त्यांच्या युक्ति व बुद्धि ऐकत असावें, त्यास सर्व विचार विचारून कार्यें करीत असावें, ऐसें केलें.

चंद्रसेन जाधवराव मोंगलाईतील चौथाई सरदेशमुखी बाबतीचे अंमल बसवावे, उगवावे म्हणून फौजा सनदा देऊन, पोख्त सामान तयारी करून देऊन रवाना केले. दमाजी थोरात पाटस तर्फेतील हिंगणगांव येथें गढी करून पुंडपणा करीत होते. स्वाऱ्या करूं लागले. व उदाजी चव्हाण हे करवीर प्रांतीं अथणीकडे राहून वडगांव येथें असोन, उभयतांही संभाजी राजे यांचे लक्षांत राहून, सातारा प्रांतपर्यंत स्वारी करावी, चव्हाणचौथाई म्हणून घ्यावी, गांव लुटावे, मारावे, करूं लागले. महाराजांनीं सर्व कारखाने किल्ला सातारियावरि ठेवून वरता वाडा बांधाविला. शाहू-तलाव म्हणून तळें केलें. कांहीं लोक वरते [ कांहीं ] खालीं रहावे असें केलें. जाधवराव सेनापति यांचे पदरीं बाळाजी विश्वनाथ बाबतीच्या मामलती करून होते ते फौजेंत जाधवराव या

समागमें होते. एके समयीं लष्करचें कूच जालें. रँव[७२] पडली. त्यांत हरण उठलें. त्याचे मागें पिराजी राँऊत[७३] म्हणून बाळाजीपंत यांजकडील पथकांत शिलेदार होते ते लागले. पुढें मुक्काम होऊन डेरे राहुटया जाल्या त्यांत ठयासराव म्हणून ब्राह्मण कारकून जाधवराव यांजकडील होते, त्यांचे राहुटींत हरण शिरलें. त्यांचे मागें पिराजी राऊत लागून गेले. राहुटींत पाठीशीं आलें म्हणून ठयासराव राहुटीचे तोंडीं उभे राहिले. तों हे जाऊन "आमची शिकार द्यावी" म्हणूं लागले. तेव्हां ठयासराव "आम्ही ब्राह्मण, आमचे राहुटींत आलें. पाठीस निघालें तें देतां नये. मारूं नये." बोलले. राऊतही आग्रहास आले जे, "आमची शिकार आम्ही नेऊं." असा उभयतांचा आग्रह. तेव्हां पिराजी राऊत यांणीं भाला टाकिला. तों हे पुढें जाले यांस लागला. जखम जाली. हें पाहून पिराजी राऊत जाऊन बाळाजीपंत यांस वर्तमान कळविलें. "अशी गोष्ट घडली, या उपरि बचाव करणें आपणाकडे आहे," म्हणून सांगितलें. तों हें वर्तमान सेनापतीस समजलें. ब्राह्मणावर वार टाकिला. जखम शिकारीसाठीं केली. हें अयुक्त जालें. म्हणून पारपत्य शिक्षा त्यास करावी, [ असें ] ठरावून बाळाजीपंत नानांस सांगून पाठविलें जे, "तुम्हाकडील स्वारानें ब्राह्मणावर जखम केली; त्यास पाठवून द्यावा. चौकशी करून शिक्षा जाली पाहिजे." तेव्हां बाळाजीपंत नानांनीं सांगून पाठविलें, "हरणावर भाला टाकिला तों राव मध्यें आले याजमुळें लागला. अपराध खरा, परंतु सरकारच्या पदरचे लोक आहेत. येऊन आम्हांपाशीं पोंचले. पाठीस पडले. त्या अर्थीं क्षमा करावी. पारपत्य करणें, तैनात बुडवणें, घालवणें, दूर करणें आम्हीच करितों." असें सांगून पाठविलें असतां सेनापति आग्रहास पडले जे, "त्याचें पारपत्यच जालें पाहिजे. पाठवून द्यावें." ते समयीं बाळाजीपंतही आग्रहास आले. कळोन स्वार पथके रवाना केले जे, "सुप्रयुक्त[७४] राऊत हातीं न देत तरि हल्ला करून पथक लुटून धरून आणावे." हें वृत्त कळतांच हेही पथक तयारी करून कूच करून निघोन चालले. लोकांस ताकीद केली जे, "जमून जाऊं नये. थोडे थोडे टोळ्या करून चहूं वाटेनें जिकडे जसें कळेल तसें निभावून जेजूरी, सासवड येथें सर्वांनीं येऊन पावावें." आपण शें सवाशें स्वारानिशीं एका मार्गें निघोन चालले. हें वर्तमान जाधवराव यांस समजलियावरून दोन तीन हजार फौज जमवून पाठविली. "त्यांच्या मागें जाऊन जेथें सांपडतील तेथून धरून आणावे,"

---

७२. रव पडली=रांग लागली.

७३. 'पि (प) दाजी' चिटणीस प्रत. पुढेंही 'पदाजी' असाच या प्रतीचा पाठ आहे. इंदूर प्रत 'पिदाजी' देते. कोलापुर प्रतींत 'पिराजी' असें आहे.

७४. सुप्रयुक्त=बऱ्या बोलानें, नीटपणें.

सांगून रवाना केले. बाळाजीपंत यांणीं अंबाजीपंत पुरंदरे यांचे हातून सचिव यांशीं राजकारण करून पुरंदर किलियाचे आश्रयास जाऊन राहिले. बाळाजीपंत फौज गेली त्यांचे हातीं लागले नाहींत. हें वर्तमान कळलियावरून [ सेनापतींनीं ] आपण खासा फौजसुद्धां कूच करून, बारामतीवरून सुपें येथें येऊन सचिव यासि सांगून पाठविलें जे, " बाळाजीपंत यांस तुम्ही आश्रय देऊं नये. दिल्हा असतां आम्हास तेथें येणें प्राप्त आहे. तुमचे मुलकाची खराबी होईल." यावरून सचिव यांणीं बाळाजीपंतांस सूचना केली, " तुमचा परिणाम येथें लागणार नाहीं. यावरून उभयतां पुत्र बाजीराव [ व ] चिमाजी आपा होते ते व कुटुंबसुद्धां अंबाजीपंत पुरंदरे यांसि घेऊन, तेथून कूच करून, धुमाळ[७६], शिलेदार पथकांत चाकर होते, त्यांचें घर परींचे येथें होतें, त्या खिंडीनें उतरोन, आणखी पांच सातशें नवे स्वार ठेवून, जमाव करून, नीरेवर आले. तों सेनापतीनें लोक पथकें आडवीं रवाना केलीं. त्यांचीं यांची गांठ नीरेवर पडली. थोडी लढाई झाली. तेव्हां सेनापती-बराबर फौज सरंजाम भारी. आग्रहास पडले. याउपरि आपला परिणाम महाराजांस शरण जाऊन आश्रय केल्यावांचून लागत नाहीं; ऐसा विचार करून पांडवगडची माची थोर, जागा बिकट लोक सुद्धां दम खावयास योग्य आहे; तेथें लोक ठेवून, महाराजांकडे सांगून पाठवून, विचार आणवून, तेथें जावेसें करून, पांडवगडचे माचीस जाऊन उतरले. आणि अंबाजीपंत पुरंदरे यांचा व खंडो बल्लाळ यांचा स्नेह आहे. यांचे वाद प्रकरणीं जाणें येणें त्यांत [ स्नेह ] जाला होता. त्यांचे विद्यमानें बोलणें करावें म्हणून [ त्यांस ] पाठविलें. त्यांणीं जाऊन भेट घेतली. आणि उभयतां[७७] मिळोन महाराजांपाशीं बोलणें केलें जे, " बाळाजीपंत शहाणे कर्ते शिपाई मोठे माणूस यांजवर सेनापतीनें असें गुदरलें म्हणून स्वामीस शरण आले. सेनापतीपासून रक्षण करण्याचें अभय देऊन, रक्षिलें पाहिजे. संरक्षण होण्यास अन्य त्राता कोणही नाहीं. बाळाजीपंत बहुत चतुर मनसब्याविषयीं व शिपाई मोठे धाडसाचे आहेत. मोठीं कार्यें करावयास सेवा करण्यास योग्य आहेत. " ऐसें समजाविलें. यावरून त्यांचीं पत्रें आलीं तीं पाहून, माणूस शहाणे, आपलेपाशीं ठेवावयास योग्य, आपणांस चांगले माणसांचा संग्रह करणें

---

७५. अंबाजी त्रिंबक—हे पुरंदरे यांच्या घराण्याचे मूळपुरुष. हे सासवडचे देशपांडे. त्यांचें नांव ' आबाजी पुरंदरे ' असें ग्रांट डफ सुद्धां सर्व इतिहासांत दिलेलें सांपडतें तें चुकीचें होय. ' अंबाजी ' हें खरें नांव ह्या बखरीच्या दोन प्रतींत असून पुरंदरे यांचे छापील वंशावळींत ही हेंच दिलेलें आहे. ग्रांट डफ म्हणतात हे कुळकर्णी होते.

७६. धुमाळ व पिलाजी जाधव यांणीं बाळाजीस पांडवगडास पोंचविलें. ग्रांट डफ. धुमाळ घराणें हल्लीं वीरास राहतें. जाधव हे परींच्यास आहेत.

७७. चिटणीस व पुरंदरे.

आहे, [ तेव्हां ] जाधवराव आग्रहास पडले, त्यांस समजोन सांगोन घडेल तसें करणें, आपणांस शरण आले, तेव्हां प्राप्त आहे. म्हणून अभय-पत्र देऊन, हुजूर यावें सांगितलें.

हें वर्तमान सेनापतींसही समजलें. बाळाजीपंत महाराजांचे आश्रयास गेले, व त्यांजला महाराजांनीं अभय दिल्हें. यावरून त्यांणीं पत्रें पाठविलीं जे, " बाळाजीपंत यांस स्वामींनीं आश्रय दिल्हा असतां आम्हांस महाराजांचे पाय सुटतील. आम्हांस त्यांचें पारपत्य केल्यावांचून रहावयाचें नाहीं. " यावरून महाराजांनीं सेनापतींस पत्र लेहून खंडो बल्लाळ चिटणीस यांस बहुत प्रकारें पर्याय सांगून रवाना केलें असतां, त्यांचा आग्रह बहुत पडला. यावरून परत आले. आणि त्यांचे आग्रहाचीं बोलणीं समजाविलीं. तेव्हां महाराजांनीं हैबतराव निंबाळकर सरलष्कर यांस पत्रें पाठविलीं जे, " सेनापतींस सरकाराशीं विरुद्ध करण्याची बुद्धि निर्माण जाली आहे; तरि तुम्हीं आपला जमाव असेल तो घेऊन व नवाही जमा करीत करीत सेनापतींस मोकाबला देऊन जलद उँतरावें. इकडून हुजरातची फौजही तुम्हांपाशीं येऊन पावेल. " म्हणून कांहीं सरदार रवाना केले. सरलष्कर फलटणावरि येऊन उतरले, हें वर्तमान सेनापतींस समजून पांडवगडचा रोख सोडून सेनापति दहीगांव जेऊर येथें उतरले. सरलष्कर यांसि महाराजांची आज्ञा घाटावर येण्याविशीं गेली. ते आदरखीचा घाट चढून त ले बी चे कु ळें चे मुक्कामीं आले. तों सेनापतीही घाट चढून पुढें आले. ते समयीं सेनापतीस पुनः महाराजांनीं सांगून पाठविलें जे, " तुम्हीं सरकारची अवज्ञा करावी, सरकारी फौज सरलष्कर यांशीं लढाई करावी, हें तुमचे सेवाधर्मास विहित नाहीं. " तत्रापि सेनापति विचारावर न येत. लढाई करावी हाच आग्रह पाहून सरलष्कर यांसही पत्रें पाठविलीं कीं, " लढाईस आलियावरि तुम्हींही सेवेची शर्त करून लढाई द्यावी. " आणखी हुजुरात पागा लोक कुमकेस रवाना केले. यावर सेनापति सरकारची फौज कमी, आपली ज्यास्ती, म्हणून लढाईस चालून गेले. लढाई बहुत तारफेची झाली. सरलष्कर व हुजुरात यांणीं महाराजांचा प्रताप निशाणें चालवून घोडे घातले. त्यांत सेनापतीचा मोड जाहला. फौज सुद्धां पळाले. ते पुनः रहिमतपुरावरि जयून दरमजल पन्हाळियास गेले. संभाजीराजे यांस भेटून वडगांव गुंमठें, शिरोळें, व कोल्हापूर हीं ठाणीं घेऊन त्यांसें दिलीं. कागलकर, घाटगे

---

७८. उतरावें=हलकें करावें, रग जिरवावी.

७९. ही ओळ नीट लागत नाहीं.

८०. ' गुमठ ' चिटणीस प्रत ' कुमठें ' इंदूर प्रत.

८१. ' शिरवळ ', ' शिराळें ' असेही पाठ आहेत.

८२. त्यांस=संभाजीस. हीं ठाणीं इतके दिवस शाहूकडे होतीं असें होतें.

व काटक लोक असा आणखी जमाव करून बालेघाटीं निघोन गेले. आणि प्रतिज्ञा केली कीं, " सरलष्कर यांशीं लढाई करून त्यास मोडावें, तर आंगावरि दुसरीं वस्त्रें घ्यावीं; व महाराजांनीं बाळाजीपंत यास हवालीं केलें तरि महाराजांस भेटावें, मुजरा करावा, नाहीं तरि भेटावयाचें नाहीं." असे आग्रहास येऊन विरेस पडले. आणि मोंगलाईंत राजकारण करून, किलीजखान[३] नबाब यास भेटले. त्यांणीं साठ लक्षांची जहागीर फौज सरंजाम व जातीस नेमिला. त्यांजबराबर धारराव प्रभु कळंबेकर सरकारचे सरदार होते तेही तिकडे गेले. त्यांस त्यांतच नऊ लक्षांची जहागीर व साहेब नौबत वगैरे दिलें. आणखी मातबर सरदार त्यांचे निसबतीचे कांहीं गेले त्यांस योग्यतेनुरूप दिल्हें.

[ इकडे ] सरलष्कर फत्ते करून महाराजांस येऊन भेटले. त्यांची तारीफ करून बहुत सन्मान केला. त्यांस जहागिरीचे बंदोबस्तास जाण्यास निरोप दिला. ते गंगातीरीं गेले. तेव्हां सेनापतीनें कांहीं नबाबाकडील फौज कुमकेस घेऊन, व पांढरे वगैरे सरदार घेऊन, सरलष्कर यांजवर चालून लढाईस आले. ते समयीं महाराजांनीं बाळाजी विश्वनाथ यांस सरदारी सांगून, सेनाकर्ते असें पद बहुमान वस्त्रें देऊन कांहीं पागा व हुजरात बराबर देऊन [ पाठविलें. ] सरलष्करही पुणे प्रांतीं आले. ते हे मिळोन पुरंदरानजीक नारायणापाशीं राहिले. सेनापति चालून आले. तेथें लढाई बहुत मातबर झाली. सरलष्कर व बाळाजीपंत यांनीं जातीनें शिपाईगिरी करून तरवार केली. प्रहर दोन प्रहर लढाई होऊन आडून उभे राहिले. मोंगल लोकही आडून उभे राहिले. दोहींकडील चांगलीं माणसें बहुत कामीं आलीं. समतुल्य लढाई, एकमेकांस हटेनात, असें होऊन सायंकाळ जाहलियावरि उभयतांही मार्गे सरून आपलाले तळावर जाऊन राहिले. नंतर बाळाजीपंत व सरलष्कर यांस तुम्हीं सालपेच्या घाटाखालीं मैदानांत यावें लिहिलें. यावरून कूच करून आले. पुण्यास उपद्रव लागेल म्हणून आणविलें. सालपे याजवर राहिले. सेनापति नीरेवर येऊन उतरले. आणि " तह व्हावा, स्वामीचा आग्रह बाळाजीपंत आमचे हातीं द्यावयाचे नाहींत तरि आपणांपासून घालवून द्यावे. आम्हीं बाळाजीपंतांपाशीं वांकडे चालणार नाहीं," येविशीं खात्री करून ऐशीं बोलणीं पडलीं. तेव्हां महाराजांनीं सांगून पाठविलें, " या गोष्टी घडावयाच्या नाहींत. तुम्हीं आग्रह सोडून येऊन भेटावें. तुमची सेवा तुम्हीं करावी. " ती गोष्ट न माने. विचार केला जे, " शेवटवरि महाराजांशीं हरामखोरी करून लढाई करावी [ तर ] युद्धच महाराजांशीं करून परिणाम लागावयाचा नाहीं. " समजोन चिठकोदें

[३]. किलीजखान=निजामउलमुल्क. हा पहिल्यानेंच दक्षणच्या सुभ्यावर आला होता ( १७१२/१३ ) तों हें राजकारण आयतेंच त्याजकडे आलें.

भालकी वगैरे जहागीर नबाबांनीं दिली तिकडे निघोन गेले. यानंतर महाराजांनीं त्यांचे घराण्यांतील संताजी जाधवराव यासि आणून सेनापतिपदाचीं वस्त्रें सरंजाम याच्या सनदा करून दिल्या.

या समयांत प्रतिनिधि परशरामपंत यांनीं विशाळगड तालुका आपणांस द्यावा म्हणून आड घातली. खंडो बल्लाळ यांचे बंधु निळो बल्लाळ यांजकडे सुभा होता, त्यांस आणून बहिरव मोरेश्वर पिंगळे मुख्य प्रधान यांचा कारभार मुतालकीचा सांगून व तालुका दुसरा देऊन, विशाळगड प्रतिनिधीस दिला. त्यांनीं त्यांचे वडील पुत्र कृष्णाजी परशराम यांचे नांवें करून देऊन त्यांस कारभारी मोरो शामराज करून देऊन पाठविलें. कांहीं दिवशीं त्यांचे बुद्धीस भेद करून, मोरो शामराज यास मेळवून घेऊन, तालुका संभाजी राजे यांजकडे दिला. हा दोष आला. आणखीही किलियांचीं राजकारणें केलीं. हें वृत्त महाराजांस कळलें. यावरून प्रतिनिधीस कैदेंतून सोडून पद देऊन सर्फराज केलें असतां पुन्हा संभाजी राजे यांजकडील पक्ष सुटत नाहीं. पुत्रांनीं केलें हें त्याचे संमतीवांचून कसें होईल ? म्हणून तत्काल चौकी पाठवून कैद केलें. महाराजांस बहुतच क्रोध आला. आणि समक्ष प्रतिनिधीस आणिलें आणि डोळे काढावे ऐसा मनांत आवेश येऊन जेठी पैलवान बोलावून आज्ञा केली जे, " तक्ता उरावर ठेवून डोळे काढावे. " ऐशी आज्ञा केली. ते समयीं जवळ लोक होते त्यांची कोणाची शक्ति रदबदली करण्याची न होय. जेठीनें तक्ता आणोन उरावर ठेविला. आणि पाय दिला. दोन प्रहरचा समय. जवळ मातबर मुत्सद्दी कोणी नाहीं. [ अशांत ] खंडो बल्लाळ चिटणीस घरीं स्नान करीत होते त्यांस हें वर्तमान समजतांच तसेच धांवून येऊन जेठीनें उरावर गुडघ्याचा पाय दिला तो पाहून आधीं जेठी मागून धरून [ त्यास ] माघारें पाडिलें. शरीरेंकरून बलाढ्यही होते. तसेंच पुढें जाऊन महाराजांस साष्टांग नमस्कार घालून हात जोडून उभे राहिले. जे " मी सर्व प्रकारें अपराधी आहें. आधीं माझे डोळे काढणें, किंवा शिरच्छेद करण्यास हुकूम व्हावा. नंतर प्रतिनिधीचें पारपत्य पाहिजे तसें करण्यास आज्ञा व्हावी. " ते समयीं महाराजांस क्रोध न साहे. उत्तर न करतां उठोन माजघरांत गेले. क्षण एक उभे राहून पुन्हा दारांत येऊन बोलले जे, " काय म्हणतां ! " सर्वांग, होट, कंपायमान, क्रोध सांवरेना असा आला. तेव्हां यांनीं पुन्हा विनंति केली जे, " महाराज ! ब्राह्मणास इतका उग्र दंड होऊं नये. पूर्वीं संभाजी महाराजांनीं केलें त्या योगें राज्याची व्यवस्था कशी झाली, हें सर्वजाण स्वामी आहेत, [ मी सांगणें नलगे, ] यास्तव मीं आज्ञेशिवाय जेठीस उठविलें हा अपराध माझा जाहला. " असें बोलले वरि पुन्हा महाराज " काय करावें तें सांगा " असें बोलले. तेव्हां विनंति

केली जे, " परशरामपंतासारिखे पराक्रमी सेवक माणूस असे मारूं नये. मोठे अघटित कामावर घालून मारावे. बेडी घालावी कैदेंत ठेवावे. " यावरून बेडी आणवून लोहार आणवून घालण्यास आज्ञा झाली. ते आणविली. नंतर आणखी विनंति केली कीं, " सरकारचे प्रतिनिधि, यांपरते दुसरें कोणी मोठें नाहीं. यांस रुप्याची बेडी असावी. " " ते घालावी " अशी आज्ञा जाहलियावरि मोठ्या रुप्याच्या सांखळ्या घालून, किल्लयावर सर्व तजवीज करून, भोजनाची वगैरे तर्तूद बहुत चांगली ऐसे राखून ठेविले. नंतर किल्ल्यावर घातले. नंतर नारो प्रल्हाद, गदाधर प्रल्हाद यांचे भाऊ, यांस प्रतिनिधिपद दिल्हें. ते शके १६३३.

बहादूर शहाजादे दक्षणेंतून सर्व फौज व शिवाजी महाराजांची सर्व दौलत खजीना औरंगजेबानीं नेला तो सुद्धां निघोन दिल्लीकडे गेले. तो अजमशहा तख्तावर बसून तिकडील वजीरखान वगैरे अनकूळ होऊन पादशाही करूं लागले. सर्व सरदार सुभे राजेरजवाडे एक करून पुढे चालून बाहेर आले. हेही दिल्लीनजीक जाऊन पावले. दोहींकडील पोख्त सामान पठाणी फौज आडून उभे राहून तोफखाना गारद जंगी सामान मातबर लढाई जाहली. बहुत तारफेची लढाई [ झाली. ] घोडे माणूस व सरदार बहुत पडले. हत्ती रणांत पडले. ऐसें तुंबळ युद्ध झालें. रक्ताचे पाट वाहिले. अजमशहाचा मोर्ड जाहला. बहादुरशहा फत्ते पावले. ते हत्ती चालवून तिरंदाजी करीत करीत गेले तों अजमशहापुढें आले, ते तीर लागून ठार पडले. बराबरचे सरदार फौज राहिली ते सर्व बहादुरशहास येऊन भेटले. अलम अल्लीखान सैद मनसब्यांत लढाईंत बहुत कामास आले. त्यांस बहादुरशहांनीं [८७] वजीरी दिली. किलीजखां सुभा मागितला. ही लढाई आग्र्याजवळ झाली.

८४. ह्या प्रसंगीं चिटणिसांनीं परशरामपंताचा जीव वांचविला, हा उपकार स्मरून पुढें प्रतिनिधीकडे श्राद्धाचे दिवशीं चिटणिसांकडील एका खाशास भोजनास बलावून त्याजला श्राद्धाचे ब्राह्मणांबरोबरच जेवायास बसवीत. असें एका ठिकाणीं लिहिलेलें आढळतें. हा क्रम बरेच दिवस चालला होता.

८५. ही मागें दाखविलेलीच चूक होय. बहादूरशहा वडील. तो दिल्लीकडे असून तोच तख्तनशीन झाला. अझमशहा धाकटा. तो दक्षिणेंतून साम्राज्य मिळविण्याकरितां हिंदुस्थानांत गेला.

८६. अझमशहाचा पराभव होऊन तो मारला गेला हें मात्र बरोबर आहे. याच्या बाजूस झुल्फिकारखान होता. तो पुढें बहादरशहाकडे गेल्यावर त्याजकडे दक्षणचा

८७. ही बखर लिहिणाराची चूक होय. बहादरशहास जय प्राप्त झाला. तो दिल्लीस जाऊन थोड्याच दिवसांनीं मृत्यु पावला. त्याचे जागीं झुल्फिकारखा यांनीं जहांदारशहा यास बसविलें. इतक्यांत बहादरशहाचा नातु फिरुकशीर, बहार प्रांतीं होता, त्यानें अबदुल्ला व हसन ह्या दोन सय्यद सरदारांशीं सधान करून, त्यांची फौज कुमकेस घेऊन जहांदारशहावर चाल केली. जहांदारशहा नाश पावला. झुल्फिकारखां यास फांस लावून मारिलें. आणि फिरुकशीर तख्तनशीन होऊन त्यानें अबदल्ला याजकडे बक्षीगिरी व हसनकडे वजीरी असे अधिकार दिले. ह्या गोष्टी १७१२-१३ मध्यें झाल्या. त्याच वेळीं सय्यद यांनी

निजाम उल्मुलूख यानकडे दक्षिण सहा सुभ्यांचे जाहागिरीचे अमलाचा सुभा होता. तो तगीर करून सैद याचे भाऊ हुसन अल्लीखान सैद यांस सुभा दिल्हा. शहरांत जाऊन पादशाईचा बंदोबस्त करून तख्तावर बसले. हुसन अल्लीखान दक्षणचे सुभ्यावर येतां मातबर माणूस दक्षणचे माहीतगार बराबर द्यावे म्हणून पादशहा यांनीं संक्राजी मल्हार सचिव चंदीहून काशीवासास गेले होते ते बहुत शहाणे कर्ते ऐसें ऐकून त्यांस बहुत आग्रह करून काशीहून आणवून त्यांचा बंदोबस्त चांगला करून देऊन सैदाचे बराबर कारभारी करून दिल्हे. निजाम उल्मुलूख यास तगिरी जाहली हें कळलें. त्यावरून फौज व जमाव सुद्धां दिल्लीस जाण्यास निघाले. तों बराणपुरानजीक सैदाची गांठ पडली. हिशेब व वासलींत देऊन नंतर जाण्यास सांगितल्यावरून थोडीशी लढाई पडली. नंतर तह ठरवून निघोन गेले. सैद औरंगाबादेस पोंचून सुभा करूं लागले.

दमाजी [ थोरात ] पाटस वगैरे प्रांतीं राहून बंड करून मुलकांत खंडणी घेऊं लागले. त्यांचा बंदोबस्त करावा म्हणून थोडा बहुत जमाव देऊन बाळाजी विश्वनाथ यांस पाठविलें. ते जाऊन लढाई जाहली. त्यांनीं ठाण्यांत राहून फितूर दगाबाजी करून बाळाजीपंत व अंबाजीपंत पुरंदरे यांस धरिलें. आणि पैका खंडणी द्यावी म्हणून अंबाजीपंत पुरंदरे यांस तसदी बहुत केली. राखेचे तोबरे वगैरे अविचार केला. यावरून खंडणी ठरवून हरतऱ्हे निघावें. फौज रवाना केली असतां दगा करतील. दुसरें करून निघावें म्हणून महाराजांनीं सूचना पाठविली. यावरून ठरावून अंबाजीपंत व पिलाजी जाधव यांनीं आपणावर तसदी सर्व सोसून बाळाजीपंत यांस तसदी न लागूं देतां त्यांस ठेवून पैका तरतूद करून आणितों म्हणून बाहेर येऊन, ठरावाप्रमाणें ऐवज नेऊन देऊन, बाळाजीपंत सुद्धां निघोन आले. नंतर नारो शंकर सचिव जमाव घेऊन दमाजीवर चालून गेले. त्यांसही मोड करून धरिलें. यावरून बाळाजीपंत यांणीं पिलाजी जाधवास पाठवून मध्यस्ती करून ऐवज ठरावून देऊन आणिले. ते समयीं सचिव यांची मातोश्री येसूबाई यांजपासोन पुरंदर किल्ला आपणाकडे घ्यावा ऐसा करार करून घेतला. आणि महाराजांस अर्ज करून सासवडास कुटुंबे ठेवण्यास वगैरे उपयोगी आहे म्हणून किल्ल्याच्या सनदा आपले निसबतीस द्याव्या ऐशा करून घेऊन घेतला.

---

निजामउल्मुलुख यास दक्षणचे सुभ्यावर पाठविलें. ( मागें पृष्ठ २३ टीप ८१ पहा. ) पुढें फिरुकशीर व सय्यद यांचें वैमनस्य पडून त्याणें हसन यास आपणापासून दूर करावें म्हणून त्याची दक्षिणेच्या सुभ्यावर रवानगी केली ( १७१६–१७ ).

८८. तगीर=जप्त. तगीर करून=काढून.

८९. वासलात=एकंदर हकीगत.

९०. मागें पृष्ठ १९ ओळ २६ पहा.

जाधवराव मोंगलाईंत गेले त्यांजपाशीं शहाणे माणूस नारो राम शेणवी व होनाजी अनंत व आनंदराव होते. ते याउपरि यापाशीं राहणें उक्त नाहीं म्हणून महाराजांकडे निघोन आले. त्यांचा गौरव करून बंदोबस्त करून महाराजांनीं ठेविले. महाराज खांसास्वारी श्री जेजूरीस देवदर्शनास आले. दमाजी थोरात यांस भेटीस यावें ऐसें ठरावून भेटीस आणिले. इमान प्रमाण पाठविलें यावरून आले. आणि महाराजांनीं सांगितलें जे, "तुम्हीं याउपरि बंड न करितां श्रीपाशीं बेलभंडार देऊन आम्हांपाशीं रहावें. तुम्हांस सरदारी व कांहीं मुलूख जागीर देऊन उत्तम प्रकारें ठेवूं" ते समयीं त्याचे मुखांतून आलें जे "बेलभंडार कशास पाहिजे! भंडार म्हणजे आमची नित्य खावयाची हळद! बेल तरी झाडाचा पाला!!" हें ऐकून महाराजांनीं विचार मनांत आणिला जे, "हे बेइमान व उद्दाम आहेत. आपण इमान देऊन आणिले यास दगा करून धरून धरणें ठीक नाहीं आणि यांनीं बाळाजीपंत व सचिव यांस दगा करून धरून अमर्यादा केली. मातबर सामान पाठवून पारपत्य करणें काय अगाध आहे?" बहुतांचें बोलणें ये समयीं यांस धरावें म्हणोन पडलें. ते समयीं महाराजांनीं "इमान दिल्हें असतां हें करणें सर्वथा करावयाचें नाहीं" म्हणून सांगून बहुमान वस्त्रें देऊन निरोप देऊन लावून दिल्हे. आणि महाराजांची स्वारी सातारां आली. आणि बाळाजी विश्वनाथ यांजबराबर फौज, पागा, व तोफखाना मातबर देऊन रवाना केलें. बाळाजीपंत यांस घोड्यावर बसणें कांहीं कमी होतें. परंतु शूर धारकरी [ होते. ] यांजबराबर घोड्याजवळ माणसें असोन ऐसे होते. सरलष्कर ही बरोबर दिल्हे. ते जाऊन लढाई देऊन, त्याची फौज मोडिली. ठाणें यास तोफा लावून ठाणें पाडिलें. भोंवतें घेरून ठाणें हल्ला करून घेऊन, दमाजी थोरात यास धरून आणिलें. ठाणें पाडून टाकिलें आणि थोरात यास बेडी घालून कैदेंत ठेविलें.

खटावकर ब्राह्मण राजे यांस महाराज ऐसा मोंगलाईंतून किताब होता. ते पाळेगिरी करीत. त्यांजवर फौज देऊन बाळाजीपंत रवाना केले. तेव्हां श्रीपतराव हे परशराम त्रिंबक प्रतिनिधीचे पुत्र महाराजांपाशीं मोकळे होते, त्यांस परशरामपंत यांणीं सांगून पाठविलें, "तुम्ही सेनाकर्ते जातात त्यांजबरोबर या लढाईंत जाऊन चाकरी व आपली शर्त असेल ती करून तरवार करून महाराजांस संतोषित करून आम्हांस सोडवावें. अगर मरून जावें." यावरून त्या लढाईत जाऊन, बहुतच शर्तीनें दोन चार वेळ उलटोन तरवार मारली. खटावकर मंडळी बहुत शिपायी मर्द झाडून उभे राहून लढाई दिली. परंतु सरकारी सामान भारी. त्यांचा मोड जाला. नंतर तह करून महाराजांस येऊन

११. हिंगणगांवच्या गढींत दमाजी रहात असे.

भेटून पदरीं पडले. त्यांजकडे तो गांव इनाम ठेवून तैनाता वगैरे करून ठेविले. श्रीपतराव यांणीं बहुत मर्दुमी करून तरतुदीनें लढाई केली, हे बाळाजीपंत यांणीं तारीफ समजाविली. याजवरून महाराजांची मर्जी प्रसन्न जाहली. नंतर परशरामपंत यांची याउपरि निखालस चालण्याची खातरजमा जाहली, म्हणजे सोडून पद सांगावयासि येईल [ असें ] बोललेवरून बाळाजीपंत व खंडो बल्लाळ चिटणीस यांणीं खातरजमेचीं बोलणीं करून, परशरामपंत यांचा पक्केपणा करून घेऊन, समजाविलेवरून सोडून शफत प्रमाण घेऊन पुनः पद प्रतिनिधि बहुमान वस्त्रें दिल्हीं.

कान्होजी आंगरे सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग वगैरे जंजिरे[१३] किल्ले लोकसुद्धां संभाजीराजे यांचे लक्षांत राहिले. आणि [ त्यांणीं ] बहिरोपंत पिंगळे प्रधान यांजकडे कल्याण प्रांत तालुका होता, [ ते ] तिकडे गेले होते, त्यांजवर जमाव करून चालून जाऊन लढाई केली. त्यांत प्रधान यांचा मोड जाहला. प्रधान व निळो बल्लाळ यांस धरून कैद करून ठाणीं आपलीं बसवून राजमाची व लोहगड[१४] वगैरे किल्ले घेतले. यावरून महाराजांस आंगरे यांचें पारपत्य करून, कोंकणप्रांत जंजिरे किल्ले सोडवावे, प्रधान सोडवून आणावे, प्राप्त जालें. तेव्हां हे मसलत बाळाजी विश्वनाथ यांस सांगोन दहा हजार फौज व दहा हजार पायदळ बराबर देऊन रवाना केलें. ते राजमाची वगैरे किल्ले घेत घेत, त्यांजकडील ठाणीं उठवीत उठवीत, व लढाई पडेल तेथें करीत कोंकणांत गेले. तेव्हां कुलाबा प्रांतीं कुलाब्यास कान्होजी आंगरे होते. त्यारोखें अवचितगड, नागोठणें तालुक्यांत गेले. आणि आंगरे यांजकडे सांगून पाठविलें जे, "तुम्ही महाराजांचे पदरचे मातबर सुभेदार. तुकोजी आंगरे तुमचे वडील यांणीं शिवाजीराजे महाराज थोरले यांजपाशीं सेवा निष्ठेनें करून वाढले. ऐसें असोन शाहूमहाराज वडील, सिंव्हासनाचे खावंद, [ ते ] राज्यावर आले, राज्य करितात, त्यांशीं दुरोखें[१५] राहून धाकटे भाऊ यांजकडे मिळून सरकारी तालुके घेता[१६] व प्रधान यांस धरून कैद केलें हा सेवकाचा धर्म कीं काय ? यांत हरामखोरी घडती. पूर्वी मातोश्रीस इमान दिलें तर त्यांपाशीं राहणें, सरकारी कामांत अमर्यादा करूं नये. किंवा ते[१७] हद्दपार जालियाउपरि तख्ताचे

१२. ह्या वेळीं बाळाजी विश्वनाथ व खंडो बल्लाळ हे प्रतिनिधीच्या विती उपयोगी पडले तें सांगणें नको.

१३. जंजीरा–जजीरा=जलदुर्ग.

१४. लोहगड हा कारल्याचे दक्षिणेस तीन मैलांवर आहे. राजमाची खंडाळ्याच्या घाटांतून दृष्टीस पडतो.

१५. दुरोख=( दोन + रोख ) फितूर, वेळमारू ( ? )

१६. 'देतां' असा पाठ इतर व कोल्हापूर प्रतींचा आहे तेथें 'धाकटे भाऊ संभाजी यांस देतां' असा निर्वाह केला पाहिजे.

१७. 'ते' म्हणजे संभाजी. या पूर्वी संभाजीचा पराभव झाला होता त्यास उद्देशून हें बोलणें असावें.

खावंद वडील[९८] यांजकडे येऊन भेटून सर्फराजी करून घ्यावी. हें दोन्हीही करणें नसल्यास आम्हांस महाराजांनीं पाठविलें [ आहे. ] तुम्हांशीं लढाई करून ठाणीं किल्ले प्रांत तुमचे हातून घेणें प्राप्त आहे. लढाई सुरू जालियावरि पुन्हा महाराजांची कृपा करून घेऊ म्हणाल तरि कदापि गोष्ट घडणार नाहीं. त्याचा विचार करणें असेल तो आधीं करून सांगून पाठवावें. महाराजास श्रीभगवान् अनकूल होऊन पादशाही नजरबंदीतून त्यांणीं होऊन[९९] लावून दिल्हे. राज्य प्राप्त जाहलें. आईसाहेब कनिष्ठ बंधु पराभव पावले. तेव्हां वडील तख्ताचे खावंद यांस भेटून कृपा संपादावी, हे उत्तम गोष्ट आहे. हें करणें नसल्यास सरकारचे मुलुकाची खराबी किल्ल्यांत राहून करणें ठीक नाहीं. मैदानांत आपले सामानसुद्धा तयारी करून लढाईस यावें." [ असें ] सांगून[१००] पाठविलें, याजवरून कान्होजी आंगरे याणीं आपले ठायीं विचार केला जे, " संभाजी धाकटे बंधूचे पुत्र, यांजकडेच शेवटपर्यंत राहून आग्रह धरून परिणाम नाही. आईसाहेबास शफत दिली ते शर्त करणें ती केली. तीही कैदेंत राहिली. संभाजी राजे यांस पुढें मसलत अथवा प्रताप करणेंही कांहीं नाहीं. तेव्हां महाराजे[१] गादीचे खावंद त्यांची चाकरी करावी, हे कांहीं हरामखोरी नाहीं." ऐसा निश्चय करून बाळाजीपंत सेनाकर्ते यांस सांगून पाठविलें जे, " आपण सर्व फौज मागें ठेवून कार्याकारण फौज घेऊन किल्ल्यानजीक यावें. म्हणजे भेटी होऊन बोलणीं आहेत तीं बोलोन विचार ठरेल तो [ खरा. ] आपले विचारें महाराजांची कृपा होय ऐसें करूं." यावरून बाळाजीपंत सडी फौज करून नजिक जाऊन उतरले. आंगरे पुढें सामोरे येऊन बहुत सन्मानें करून भेटी जाहल्या. मेजवान्या, व खर्चास देणें, बोलण्यांस सफाई होणें तशी जाली. हें सर्व वृत्त महाराजांस, " आंगरे याउपरि महाराजांपाशीं एकनिष्ठेनें सेवा करून आज्ञेत चालतात. येविशीं खातरजमा शपथ होणें ती जाली. त्यांस पदार्चीं वस्त्रें बहुमान व त्यांजकडील तालुका ठेवावयाचा त्यांच्या सनदा पाठवाव्या," लिहिलें. व नवे किल्ले ठाणीं कल्याण प्रांत वगैरे त्यांणीं घेतले [ होते ] त्यांच्या सोडचिठ्या घेतल्या त्या पाठविल्या. व बहिरोपंत प्रधान व निळो बल्लाळ यांस सोडवून आपणांपाशीं घेतलें, हें वृत्त [ हीं ] लिहिलें. यावरून महाराज बहुत संतोषी होऊन महाराजांनीं सरखेल पदार्चीं वस्त्रें बहुमान देऊन शिरस्तेप्रमाणें तालुका त्यांजकडे ठेविला. त्याची सालाबाद

---

९८. शाहूमहाराज.

९९. त्यांणीं होऊन=पादशहांनीं आपण होऊन.

१००. हा बाळाजीपंतांचा निरोप ध्यानांत ठेवण्याजोगा आहे.

१. येथें कोलापूर व इंदूर प्रतींत "संभाजी महाराज गादीचे खावंद त्यांची चाकरी केली तर" असें लिहिलें आहे तें चुकीनें लिहिलें गेलें असावें.

नजर रसद यांचे ठरावाच्या यादी व सनदा देऊन खंडो बल्लाळ चिटणीस यांजबराबर रवाना केल्या. ते जाऊन पावले. बाळाजीपंत व चिटणीस यांणीं वस्त्रें, बहुमान, सनदा नेल्या त्या दिल्ह्या. पुढें निःसीमपणें महाराजांचे आज्ञेंत चालावें ऐसें ठरलें. चिटणीस यांस महाराजानीं सरदेशमुखीचें वतन चौल प्रांतीचें दिल्हें होतें व खांदेरी तालुका चिटणीस यांजकडे जंजिरेसुद्धां होता; तो आंगरे यांणीं त्यांचे चुलतें किल्ल्यावर होते त्यांस धरून वतनाचे कागदपत्रसुद्धां नेले होते ते माघारे देऊन वतन सुरळीत चालवयाचीं आपलीं पत्रें आंगरे यांणीं राजपत्राप्रमाणें करून गांवगन्ना व महालांस दिल्हीं. आंगरे यांचा व हबशी याचा कलह वाढून तह बिघडला होता यावरून बाळाजीपंत यांणीं आपणांकडील फौज व लोक कांहीं कुमकेस दिल्हे. ते व आंगरे यांजकडील लोक ऐसे जाऊन त्यांचा प्रांत मारिला. शह दिल्हा. यावरून त्याचे वकील येऊन तह ठराव जाहला. याप्रमाणें करून सरकारी मुलकांत त्याचा उपद्रव न लागावा, [ असा बंदोबस्त ] केला. आणि बाळाजीपंत सेनाकर्ते यशस्वी होऊन, प्रधान पंत यांस घेऊन, अवकाशेंकरून आंगरे यांणींही येऊन भेटावेंसें करून, महाराजांचे दर्शनास सातारियास आले.

[ ते समयीं ] महाराज बहुत संतोषी जाहले. बहिरोपंत पिंगळे नाकर्तें, आंगरे यांशीं लढाई द्यावी किंवा त्यांजवर जरब राखून त्यांणीं प्रांत किल्ले बळाविले तेघ्यावे, तें राहून आपले स्वाधीन तालुका केला तो गमाविला. आपण त्यांचे कैदेंत सांपडले ते बाळाजीपंत यांणीं सोडवून आणून तालुके सोडविले. व आंगरे यांस जरब देऊन सरकार लक्षांत आणिलें. हबशी यांचा तह केला. पुढें आपणासि कर्नाटक प्रांत आपलें राज्य तें सोडवून, हिंदुस्थान माळवा सोडवून, पादशाही अंमल यांस चौथाई सरदेशमुखी स्वराज्याचे अंमल बसवावयाचे या उपयोगीं बहिरोपंत पिंगळे नाहींत. बाळाजी विश्वनाथ यांसच प्राधानपद दिल्हें असतां हे मोठीं कामें करावयाजोगे आहेत. व आपणांस शरण जाधवराव यांचे आग्रहामुळें [ आले. ] आपण अभिमान धरून यांचें रक्षण केलें त्याजमुळें जाधवराव सेनापति तुटले, आणि येथील दौलतीहून अधिक दौलत साठ लक्षांची मेळवून यवनाचे पदरीं पडून पुरुषार्थ करून दाखविला. ज्या अर्थीं बाळाजीपंताचा अभिमान धरिला, त्या अर्थीं सेनापतीचा त्याग करणें आला. तोही करून पारपत्य केलें. परंतु हें पद यांस देऊन सेनापतीहून अधिक करून दाखवावें. फौजेचें काम लढाई व मुत्सद्दीगिरी दोन्हीही करवावीं यास योग्य आहेत. मुख्यप्रधानपद तें यांस द्यावयाचें. पिंगळे वडिलोपार्जित परंतु निरुपयोगीं जाले. व बाळाजीपंतांनीं

---

१. निजाम उल्मुलुक याजकडे.

२. हबशी जंजिऱ्याचा.

३. नाकर्ते=कर्तृत्वहीन.

सोडवून आणिले हें [ त्यांस ] लांच्छन जालें. त्या अर्थी बाळाजीपंतासच पद सांगावयाचें. ऐसें सर्वमतें ठरवून, आंगरे हबशी यांचे मसलतींत कारस्थान बहुत चतुराई केली, हें चिटणीस आंगरे यांचीं वस्त्रें घेऊन गेले त्यांणीं तेथील वृत्त समजाविलें, याजवर बहुत संतोष पावून, प्रधानपदास योग्य आहेत समजोन, सुमुहूर्तें पाहून मुख्यप्रधानपदाचीं वस्त्रें बादली सही सनगें व जवाहीर, शीरपेंच, तुरा, कंठी, चौकडा, ढाल, तरवार, शिक्के कटार व चौघडा साहेबनौबत, हत्ती, घोडे, जरीपटका याप्रमाणें देऊन मुख्य प्रधान केलें. शके १६३५ विजयनामसंवत्सरे. सुरू सन आर्बा अशरीन मया व अलफ. राज्याभिषेक शकें ३९. मुतालकीचीं वस्त्रें अंबाजीपंत पुरंदरे यांस दिलीं.

प्रतिनिधि अमात्य वगैरे पदें दिलीं होतींच. सेनापति मानसिंग मोरे होते. परंतु दुसरे मोठे कर्ते माणूस पाहून पद द्यावें म्हणोन खंडेराव दाभाडे [ यांणीं ] पूर्वीपासून मोठीं कामें सुभें केले, गुजराथ काठेवाड प्रांतीं अंमल बसविला व राखिला, यावरून प्रधानपदाचे बहुमान त्याप्रमाणेंच सेनापतीचे शिरस्त्या अन्वयें बहुमान देऊन सेनापतिपद त्यांस दिल्हें. श्रीकराचार्य यांस पंडितराई राजारामसाहेबीं दिली [ होती ] ते आईसाहेबांचे लक्षीं राहिलें. पूर्वापार उपाध्ये यांजकडे चालत आली त्यांस द्यावी म्हणून मुद्गलभट उपाध्ये यांस पद वस्त्रें दिलीं. न्यायाधीशी सखो विठ्ठल यांजकडे होती ते होनाजी अनंत जाधवराव यांचेपाशीं होते ते आले, ते न्यायप्रकरणीं चतुर पाहून त्यांस पद सांगून बहुमान वस्त्रें दिलीं. तसेंच सुमंत पद महादाजी गदाधर[8] यांजकडील दूर करून आनंदराव हे जाधवराव यांजकडील आले ते कर्ते, शहाणे, मोंगलाईतील माहीतगार, वकीलीस योग्य पाहून त्यांस सुमंत पद बहुमान वस्त्रें दिल्हीं. नारो राम शेणवी हेही जाधवराव याजकडून आले, ते शहाणे पाहून मंत्रीपद, बहुमान वस्त्रें, रामचंद्रपंत पुंडे यांजकडे होतें परंतु ते पन्हाळेस आईसाहेबांकडे राहिले सबब [ त्यांजकडून ] तें दूर करून यांस दिल्हें. सरलष्कर पद निंबाळकर [ यांजकडील ] दूर करून सोमवंशी यांस दिल्हें. चिटणिसी खंडो बल्लाळ प्रभु यांजकडे होतीच. पोतनिशी खासनिशी आनंदराव महादेव प्रभु यांजकडे सांगितली ते होतेच. पारसनिशी बाबाजी निळकंठ यांजकडे होती ते संभाजी राजे यांजकडे राहिले, याजवरून यादवराव बाजी प्रभु यांजकडे सांगितली. ते सैदाकडे वकिलीस पाठविले. पोतदारी पुंडे यांजकडे होती ते पन्हाळे येथें राहिले सबब कृष्ण जोशी यांस वचन मोंगलाईहून येतां दिल्हें होतें [ त्याप्रमाणें ]

५. ' पांच ' कोलापूर व इंदूर प्रती.
६. ' शके ४० ' को० व इं० प्रती.
७. ' महाराजांनीं गंगाधर ' को० प्रत. ' माहादजी गंगाधर हणमंते ' इंदूर प्रत.
८. मागें पृष्ठ १७ टीप ७० पहा.

त्यांस दिल्ही. ते पूर्वीचे पुंडे यांचे निसबतीचे होते. त्यांसच सांगितली. सेनापति दाभाडे जाले होतेच.

याप्रमाणें अष्ट प्रधान व दरकदार व सरकारकून, कारखानदार [ नेमिले. ] जे संभाजी राजे यांचे लक्षीं राहिले व दुलगे[९] आहे ऐसें पाहून दूर करून नवीन व पूर्वीचे उपयोगी ऐसें पाहून, घालमेली करून, महाराजांनीं बहुमान यथापद्धति देऊन सर्वांनीं पराक्रम करून राज्याचे बंदोबस्ताचे उपयोगी निःसीम सेवा करावी ऐसी आज्ञा केली. आणि पूर्वी थोरले शिवाजी महाराज यांचे वेळचे धारे[१०] यांनीं राज्य चालवावें. ऐसा निश्चय करून, पूर्वील जाबते करून त्याप्रमाणें नवीन जाबते[११] करून देऊन, प्रांत, किल्ले, जंजिरे, ठाणीं व फौज व पागा हुजरात मानकरी यांचा जमाव कारखाने तोफखाना वगैरे यांचे जमाव तर्तूद कारखाने ज्यांचे त्यांस सांगून पूर्ववत करविले. तोफखाना दरोगा नागोराव मेघश्याम केले. देवराव मेघश्याम यांस राजाज्ञा यांजकडील मुतालकी सांगितली. त्याप्रमाणें सर्व अधिकारी केले. त्यांस सरंजाम व इनाम गांव व जमिनी, वतनें, नेमणुका सेवेचे लोक, हवालदार, नाईक कारखाने यांचे सुद्धां नवीन करून दिल्हे. अष्ट प्रधान व सरदार यांजकडे तालुके नेमून दिल्हे. किल्ले, कोट, ठाणीं, सुभे यांचे धारे पूर्वीलप्रमाणें करवून त्यांचे सरंजाम व लोक, दरकदार, हवालदार नेमून, त्याजवर सामान जैकीरी[१२] पूर्वीलप्रमाणें राखावें ऐसें करविलें. देव ब्राह्मण यांचे इनाम, अग्रहार, पूजा, नैवेद्य, नंदादीप, पूर्वील दिल्हे ते चालवून जेथें नाहीं तेथें नवीन बंदोबस्त करून दिल्हे. सेवक लोक बहुत निष्ठेनें महाराजाशीं आज्ञा तिळप्राय उल्लंघन न करितां चालूं लागले. याजमुळें जें कार्य ज्यास सांगितलें [ तें ] तो करावयासि गेला. तेथें [ त्यास ] यशच प्राप्त व्हावें. अघटित कार्यें तीं सेवकाचे हातेंच घडावीं. ऐसें होऊं लागलें. ज्यांणीं त्यांणीं राज्य वृद्धीस पावावें, हेंच करूं लागले. याजमुळें दिवसें दिवस राज्यवृद्धीच जाहली. महाराजांनीं देवब्राह्मणांचे ठायीं बहुत निष्ठा [ ठेवून ] महापुरुषांची[१३] स्थानें होतीं त्यांचे उत्साह महोच्छाव चालावे, अतिथि विन्मुख जाऊं नये, ऐसें करून गांव जमिनी होतें तें व नवीन देऊन चालावें ऐसें केलें. पूर्वीं श्रावणमासचा धर्म थोरले महाराज यांणीं धान्य व नख्त पंडित वैदिक व दूर देशीचे ब्राह्मण यांस चालविले होते त्याप्रमाणें चालावें म्हणून सेनापति दाभाडे यांचे तालुक्यांत नेमणूक दोन तीन लक्ष रुपये पर्यंत जावें [ अशी ] आज्ञा करून त्यांणीं श्रावणमासीं येतील ब्राह्मण त्यांजपासोन कोटिलिंगें करून रहावें.

---

९. दुलग, दुलगा=दुटप्पी, फितूर.

१०. धारे=नियम.

११. जाबते=पूर्वीचे आधारभूत लेख, कायदे कानू.

१२. " जकीरा संग्रहः स्मृतः " राजव्यवहारकोश.

१३. 'सत्पुरुषांचीं' कोलापूर व इंदूर प्रती.

नंतर सभास्तीस यथायोग्य पाहून संभावना दक्षणा दहा, वीस, पन्नास, शंभर, दोनशें याप्रमाणें देत जावें, ऐसें करविलें. तळेगांवीं करावेसें केलें.[14] सेवक लोक यांणीं जशी ज्यांणीं सेवा राजकार्ये केलीं तसे त्यांस बक्षीस व इनाम व जमीनी नवीन करून दिल्हे. व सरंजामी लोक व सरदार यांचे सरंजाम करार करून त्यांचे तालुके त्यांणीं सोडवावे, बंदोबस्त करावे, त्यांत अंमल व चालण्याचे धारे करून देऊन, स्वार कोणाचे किती असावे, जातीच्या नेमणुका इतमाम कसे चालवेसें करून, तीं पतकें कांहीं सरलष्कर यांचे निसबतीस व कांहीं फत्तेसिंग भोंसले यांचे निसबतीस, कांहीं हुजुरांत ऐसे करार केले. सेवक लोक बहुत निष्ठेनें सेवाकार्य करूं लागले. मावळे लोक पायदळ व कोंकणे सरदार हेटकरी यांचे सरदार पूर्वीचे करार करून नवीन भरती करून कांहीं विश्वासुक लोक कंक, मालुसरे व देशपांडे प्रभु लोक व ब्राह्मण सरदार पाय-लोकांचे होते त्यांस गांववतनें पावावींसें करून कामांत नेमिलें. कांहीं जवळ हुजूर विश्वासांत ठेविले. विसंकळित प्रसंग जाला याजमुळें चांगलीं माणसें, मातबर लोक, मोंगलाईंत व हपसाणांत गेले ते प्रयत्न करून आणवून सेवेंत ठेविले. त्यांचे बंदोबस्त करून त्यांस खास चौकीस ठेविलें. गोरगरीब अथवा दाद फिर्याद आहे म्हणून उभे राहिले असतां स्वारींत पालखी उभी करून, अगर मजालसींत[17] ऐकून घेऊन, समक्ष आज्ञा सांगावयाची असेल ती लागलीच सांगावी. न्यायप्रकरणाकडे सांगावयाचें असेल तें त्याजकडे सांगून पुन्हा ऐकून घ्यावें. तालुकेदार सुभेदार यांजकडील असेल ते त्यांचे त्यांजकडे सांगोन वाजवी तें होऊन कोणा एकास उपद्रव वावगा लागूं नये ऐसें केलें. ज्यास दंड करावयाचा तो उग्र दंड करावयाचाच नाहीं. शिरच्छेद करणें मारणें असाच अन्याय असल्यास बहुत विवेक करून ठरलेंच तरि कान्होजी आंगरे यांजकडे रवाना करावें. त्यांणीं मारणें त्यास मारावे ऐसें केलें. शिकारीचा हव्यास राजधर्म होय. ते बहुत तरतूद सामान वाघरी[18] वगैरे असावें तसें व त्या कारखान्यावर हजारों माणूस—जळ, स्थळ, आकाशीं शिकारीचे तीन प्रकार—त्याप्रमाणें सिद्ध असावे. बाजलगंडे चित्ते कुतरे जोड्या[19] पायदामे[20] वगैरे बाळगिले. यास दरोगे[21] मल्हारप्रभु करून दिल्हे. त्यांणीं

---

१४. पुणें येथें ब्राह्मणांस जो दक्षणा हात असे व अंशतः सांप्रतही होते, व जिचा बहुतक अंश हल्लीं दक्षणाप्राईज कमेटी आणि दक्षणा फेलोशिप्स यांजकडे लागलेला आहे, तिची मूळपीठिका ही होय. दाभाड्यांचा अपकर्ष झाल्यावर ही दक्षणा त्यांचे तळेगांवाहून पुणें येथें पेशव्यांकडे कशी आली हें पुढें येईलच.

१५. 'त्यांचे' चिटणीस प्रत.

१६. म्हणजे संभाजीची कारकीर्द.

१७. मजालस=सभा.

१८. वावरा ( वागुरा )=जाळें. 'वाघर' म्हणून पशुपक्षी यांचा 'पारध करणारे' लोकही आहेत.

१९. बा ज ल ग ड चि ते कुतरे जोड्या?

२०. पायदामे ?

२१. दरोगा—देखरेख करणारा.

सर्व तरतूद राखावी ऐसें केलें. याप्रमाणें बंदोबस्त राज्याचा केला. महाराजांनीं जें कार्य चित्तीं धरावें तें यशच यावें, अनायासें कार्य व्हावें, शत्रु आपले आपण लयास जावे, ऐसें होऊं लागलें. सेनापति, प्रधान व सरलष्कर व सेनासाहेब सुभा यांस जें कार्य, जी मसलत सांगून जिकडे पाठवावें, तिकडे यशच यावें ऐसें जालें. पूर्वी ज्यांजकडे सुभे नेमिले सांगितले, त्यांणीं तिकडील अमल बसवून सुरळीत अमल येऊं लागले. मोंगलाई झाली त्यांत मुलूख खराब जाहला. त्यास कौल, इस्तावे, तगाई देऊन लावणी आबादानी करविली. याजमुळें पृथ्वींत पर्जन्यवृष्टि यथाकाळें होऊं लागली. व पृथ्वीस पीक बहुत व्हावें, फळें, पुष्पें [ यांची ] वृद्धि होऊं लागली. मनुष्यमात्र सर्व सुखी. आपआले व्यापारांत सर्वांस बरकत यावी, सर्वांनीं सुखी असावें, ऐसें जाहलें. ज्यांस जें वतन नेमिलें त्यांत बरकत येऊन त्यांणीं सुखी रहावें ऐसें जाहलें. सर्व तालुकदार, सुभेदार नेमिले, त्यांजबरोबर सरकारी दरकदार देऊन त्यांणीं चालवावें. [ त्यांस ] जाबते करून दिले. अष्टप्रधान व सरदार यांस जातीचीं वतनें दरखदार कारखानदार सुद्धां करून देऊन त्यास सरंजाम लावून, इनाम गांव करून देऊन, बाकी फौजेच्या खर्चास नेमणूक व हुजूर खर्चाकडे नेमणुका करून हिशेब समजवावे, जाजती खर्च पाहिजे तो हुजूरची आज्ञा नेऊन होईल तसें करावें, ऐसें केलें. याखेरीज प्रधान, प्रतिनिधि, सचिव, सेनापति, भोंसले, आंगरे, वगैरे यांजकडून हुजूर खर्चास दरमाहा रुपये कोणते कारखानियास कोणाकडून किती कसे पावेसें करून, सचिव यांचेकडे हत्तीमहाल खर्च पागा, प्रतिनिधींकडे कोठी, प्रधान पंत यांजकडे इमारत वगैरे सर्व नेमणुका करून, त्याप्रमाणें समयाचे समयास त्यांणीं पावतें करून कारखाने यांचा बोभाटा तिळप्राय पडूं नये ऐसें केलें. सरकार विल्हे म्हणून राजाज्ञापद दत्तोजी[२३] शिवदेव यांजकडे त्यांजकडे वराता नेमणूक केली. तो ऐवज त्यांणीं घेऊन पोतां[२४] जमा करावा. हुजूर खासगी म्हणून नेमणूक वराता ऐवज तो पोतनीस यांणीं पोतां जमा करावा. त्याचे झाडे व चिठ्या करणें ते सरकार परवानगी होईल त्याप्रमाणें ज्यांच्या त्यांणीं चिठ्या करून खर्च झाडे पोतनीस यांणीं राखावे. अखेर सालीं शिकारखाने[२५] याचे झाडे झडतीस दप्तरीं जावे. कीर्दी व एकबेरजी तयार व्हावी. शिवाय कर्जाऊ ऐवज अधिक खर्चास लागेल तो तालुकदार यांणीं आलियावर नेमणूक होईल त्याप्रमाणें वारीत जावें ऐसें केलें.

फत्तेसिंग भोंसले प्रबुद्ध जाहले. त्यास सर्व तालुकदार आणून त्यांजकडील

---

२२. आबादानी=लागवड, वसाहत.

२३. ' पंताजी ' असेंही होईल.

२४. पोतां=सरकारी तिजोरींत, राजकोशांत.

२५. ' शिकारखाने ' असा सर्व प्रतींचा पाठ आहे. पण ' शि ' ज्यास्त पडली असावी असें दिसतें.

तालुक्यांतील दाहिजें[२६] म्हणून गांव माहाल व मोकासे कांहीं नेमून पृथक संस्थान करून त्यास दरकदार व कारखानेदार सर्व हुजूरचे नेमून देऊन त्यांची सरदारी लोक पागा व सरंजामी पदकें ऐशीं नेमून देऊन दिवाण निळो बल्लाळ करून देऊन सरदारी वाढविली. अक्कलकोट परगणा आपणास दुधाकरितां पादशहा यांणीं दिला तो, हे पुत्र ऐसे केले, त्यांजकडेस दुधास म्हणून दिला. भोंसले राजे म्हणोन त्यास सोइरिका शिर्के, मोहिते यांतील देऊन लग्नें केलीं. हुजूर असतां वरकड प्रधान यांचा नौबतखाना बंद रहातो, तो दहा कोसांचे पुढें गेल्यावर वाजावा, दहा कोशांचे आंत आलियावरि बंद असावा, दुडुमघोशीं[२७] वाजवीत येऊं नये, ऐसे कायदे आहेत. फत्तेसिंग यांचा नौबतखाना सरकारी नौबत अखेरी जालियावरि प्रारंभ करून वाजवावे, ऐसे करून दिल्हे. आणि प्रतिनिधि व प्रधान मोठे मानकरी यांणीं फत्तेसिंग यांस स्वारीस लावून दिल्हें तरि त्यांचे बराबरि जात जावें. ऐशी मोठी योग्यता [ वाढविली. ] राजपुत्रच ऐसे करून दिलें. सेनापति यांजकडे गुजराथ, अमदाबाद, काठेवाड वगैरे तालुका सुभा सांगितला. त्यांत दरमहा व हुजूर खर्चाचा ऐवज, फौज बाळगणें व हुजूर महाल खाजगीऽ सहा ठेविले. हिशेब एकंदर देत जावा. राहील कसर खंडणी वगैरे ते सरकारदाखल करीत जावे. ऐसें केलें. तसेच भोंसले सेनासाहेब सुभा यांजकडे वराड, गोंडवण, कटक व हिंदुस्थानपैकीं कांहीं महाल ऐसा सुभा नेमून दिल्हा. त्यांची नेमणूक वगैरे त्याचप्रमाणे बंदोबस्त जाबते करून देऊन दरकदार हुजूरचे सर्वांस नेमून दिल्हें. प्रतिनिधि यांजकडे स्वदेशाचा सुभा, सचिव यांजकडे मावळ, कांहीं कोंकणचे महाल व साहोत्रा याचा सुभा सांगितला. प्रधान यांजकडे खानदेश, माळवा, बागलाण सुभा सांगून पुढें हिंदुस्थानचा अमल साधेल तितका साधित जावा सांगितलें. सरलष्कर [ यांस ] गंगातीर मोंगलाईतील स्वराज्य याचे अमल यांचा सुभा दिल्हा. सर्वांस हुजूरचे दरखदार देऊन हिशेब देऊन नेमणुकेप्रमाणे खर्च करून सरकारांत ऐवज देण्याच्या नेमणुका करून दिल्या. कर्नाटक प्रांत चंदीचंदावरपर्यंत त्रिचनापल्ली वगैरे अंमल चालत आला तो गेला तो बसवावा, किल्ले ठाणीं गेलीं तीं घ्यावीं, व संस्थानी यांजकडील खंडण्या पूर्वी ठराव जाले ते येत नाहीं ते यावे, त्यास फत्तेसिंग भोंसले रवाना करावे, ऐसें करून बराबर फौज पागा व सरदार हुजुरात ऐसे नेमून दिल्हे. मंत्री व सुमंत यांजकडे मोंगलाई तालुक्यांतील बावती साहोत्रा सरदेशमुखीचे अमलाचे तालुके उगवावे ऐसे नेमून दिल्हे. कोण्हा एकाकडून रयतेस जाजती जुलूम किंवा लुटणें कौलें[२८] खेरीज होऊं नये. आज्ञा

२६. दाहिजा. ( ? )

२७. दुडुमघोशा=नौबत, नगारे वाजविण्याची एक चाल.

२८. कौल=आज्ञापत्र, हुकूम.

होईल तसें चालावें. हुजूर बोलाविलें असतां एक क्षणाचा विलंब व उजूर[२९] न करितां येऊन पावावें. सुभ्याची व पदाची घालमेल[३०] जाली आणि सनद गेली म्हणजे तसेंच त्या क्षणीं काम त्याचे हवालीं करून हुजूर निघोन यावें. कांहीं एक अवज्ञा करूं नये, ऐसें केलें. त्याप्रमाणें सर्व अष्ट प्रधान व सरदार व सुभे कोणीएक अवज्ञा न करितां बहुत निष्ठेनें चालूं लागले. त्या योगेंकरून ज्यानें ज्या कामावर जावें त्यानें तें काम करावें, यशाच यावें, ऐसें होऊं लागलें.

[ इकडे ] पादशाईंत पादशाह यांशीं सर्वाध्यक्ष सैद होऊन वजीरी कारभार करूं लागले. तें निजाम उन्मुलुक वगैरे सरदार यांस असाह्य जालें. आणि दोन भाग होऊन एकमेकांस घालवावें ऐशी मसलत वाढली. यावरून औरंगाबादेस हसन अल्लीखान सैद होते, त्यांस अलम अल्लीखान सैद यांणीं लिहिलें जे, " जुल्फकारखान वगैरे सरदार यांणीं फरोखशेहास[३१] अनुकूळ करून बखेडा आरंभिला आहे. " यावरून हसनअल्ली यांणीं संक्राजी मल्हार यांस " मसलत कशी करावी ? तुम्हीं येथें सुभ्याचें काम बंदोबस्त राखावा, आपण फौज जमाव घेऊन दिल्लीस जाऊन बखेडा मोडितों " विचारिलें. ते समयीं संक्राजी मल्हार यांणीं मसलत सांगितली कीं, " शाहू राजे पादशाहींतून सुटून आले. सर्व आपले दौलतीचा बंदोबस्त केला. मातबर सरदार व कर्ते माणसें मुत्सद्दी कार्यकर्ते जमविलीं. फौज, पागा, कारखाने मोडलेले जमविले. आणि फौज सुभे मोठे मोठे पाठवून मुलुख अंमल काबीज केला. त्यांशीं सख्य करावें. म्हणजे ते सहजच आपले सुभ्यांत उपद्रव करणार नाहींत. त्यांची फौज व लोक मदतीस बरोबर घेऊन जावें म्हणजे थोर मसलत व मोठीं कार्यें घडून येतील. नाहीं तरि मसलत बहुत दुर्घट आहे. " यावरून हसन अल्ली बहुत खूष होऊन, " तुम्ही पूर्वीं त्याचे पदरींचे, तुम्हींच या कामास जाऊन तह ठरवून पन्नास हजार फौज त्यांची कुमकेस बराबर यावी [ असें करावें. ] त्याचा खर्च देऊन व त्यांचे मतलब काय असतील ते येथें करावयाचे व पादशाहापाशीं करून द्यावयाचे ते कबूल करावे. आणि दक्षणेंत जे आमचे तर्फेचे कामावरि राहतील त्यांची मदत त्यांणीं राखावी, ऐसें ठरवून यावें " सांगितलें. तेव्हां संक्राजीपंत यांणीं मनांत विचार केला जे, " महाराजांचा प्रताप, दैव विचित्र, आहे. गुणही सर्व राजचिन्हें. दिवसेंदिवस वृद्धीस पावावें ऐसेंच आहे. आपण पूर्वींपासोन त्यांचे पदरचे, त्यांचें अन्न भक्षिलें आहे. त्यांचें दर्शन होईल. त्यांची सेवा घडावी ऐसा योग सहज प्राप्त जाला आहे. म्हणोन हसन अल्लीखानापाशीं जाऊन मसलत सिद्ध करितों ऐसें मान्य केलें. त्यांनीं बराबर लवाजिमा मातबर

२९. उजूर=सबब, उलट जाब.

३०. घालमेल=अदलाबदल.

३१. मागें पृष्ठ २५ टीप ८७ पहा.

हत्ती घोडे व पांच हजार फौज स्वार गारद ऐसे मोठे योग्यतेचा दिल्हा. व महाराजांस पोशाख वस्त्रें जवाहीर हत्ती, घोडे, उत्तम पदार्थ ऐसें देऊन रवाना केले. त आले. संक्राजी मल्हार पूर्वींचे आपले सचिव व सैदाकडून वकिलीस येतात कळोन महाराजांनीं प्रतिनिधि व अष्ट प्रधान व सरदार सर्व आणविले. संक्राजीपंत आले त्यांस सामोरे जाऊन मोठे योग्यतेनें भेटी जाल्या. त्यांनीं नजर केली. सरकारांतून बादली चौंदर घातली. त्यांस रहाण्यास जागा याचे लवाजम्या सुद्धां रहाण्या जोगी नेमून देविली. आणि सामान वगैरे त्यांस त्याचे लोकसुद्धां व खर्चास पाठविलें. नेहमीं सरकारचे कारकून त्यांजपाशीं येऊन यांस पाहिजे तें साहित्य देत जावें ऐशी तरतूद करविली. त्यांणीं सैदाकडून हत्ती, घोडे, पोशाख जवाहीर आणिलें तें सर्व प्रविष्ट केलें. महाराजांस आपली खासगत मेजवानी, पोशाख, जवाहीर, घोडे, हत्ती उत्तम पदार्थ तरवारा व नजर खजिना वगैरे करून केली. या नंतर बोलण्यास प्रारंभ करून त्यांत "आम्ही पूर्वीं पासून पदरचे, चंदीमुक्कामीं बहुत सेवा केली. चंदीचे मुक्कामींहून महाराजांची आज्ञा घेऊन श्रीकाशीवासास गेलों. व तेथें सैदांनीं आग्रह करून आणविलें आणि दक्षणेस बराबर आणिलें. तेव्हां महाराजही दक्षणेस पादशहापासोन गेले. महाराजांचा प्रताप व गुणकीर्ति थोरले महाराजांचे[33] रीतिप्रमाणें, त्या धारियानें चालणें ऐकिलें. तेव्हां स्वामींचे पाय ते आमची काशीच होय. तें दर्शन होईल म्हणून या प्रांतीं पुन्हा आलों. हल्लीं मनसबा[34] उत्पन्न झाला [आहे] यांत स्वामींची सेवा पूर्वीं केली व हल्लींही करून दाखवावी म्हणून सैदास सल्ला देऊन दर्शनास आलों. महाराजांचे गुण व प्रताप ऐकिले, तैसेच आहेत. व थोर थोर मातबर माणसें कर्तीं व अष्ट प्रधान यांचा संग्रह केला. फौज पागा कारखानें सर्व हुशार असोन व थोरले महाराजांचे धारे यांनीं दौलत चालविली [आहे.] ऊर्जित श्रीकृपें इच्छिलें[35] तें घडोन येतें, हें पाहून बहुत संतोष [पावून] कृतार्थ जालों," बोलले. महाराज यांणींही संक्राजीपंत यांचा गौरव केला जे, "तुम्ही या राज्याचे वृद्धीविशीं बहुत सेवा थोरले महाराज व काकासाहेबांपाशीं[36] केली. महाराजांनीं अशीच पोक्त कर्तीं माणसें समयानुसार मोठीं कार्यें करावया जोगीं संग्रहीं बाळगिलीं. तुम्हीं पूर्वीं सेवा व पराक्रम केले ते सर्व ऐकण्यांत आले आहेत. तुम्हीं महाराजांपाशीं मान्य होतां त्याप्रमाणें आम्हांस मान्य आहां. अनायासें येथें आलां. आमचें मानस तें घडून आलें. या

---

३२. बादली=भरजरी, चादर=प्रावरण, वस्त्र.

३३. थोरले महाराज=शिवाजी शककर्ते.

३४. मनसबा=मसलत, राजकारण.

३५. 'ऊर्जित श्रीनें घडविलें तें घडोन येतें' कोलापूर प्रत.

'श्रीनें इच्छिलें तें घडोन येतें' चिटणीस प्रत.

३६. काकासाहेब=राजाराम.

उपरि आम्हांपाशीं राहून पूर्ववत् सेवा करावी. तुम्हांस पाहून संतोष जाहला," बोलले. तेव्हां संक्राजीपंत यांणीं उत्तर केलें कीं जे, "कोठें ही असलों तरी महाराजाची सेवा करून दाखवावी, राज्याची वृद्धि व्हावी, हेंच यावत् प्राण इच्छितों." बोलोन सैदाचीं बोलणीं सर्व विदित केलीं. "यांत महाराजांचीं कार्यें असतील ते आज्ञा करावी. पन्नास हजार फौज व सरदार कुमकेस देण्याचे कोण कोण ते योजना करावी. त्यांस दरमहा काय तो नेमावा" बोलले. तें महाराजांसही मानलें आणि सांगितलें जे, "पूर्वीं जैसिंग राजे येऊन महाराजांचा तह होऊन दिल्लीस जाते समयीं स्वराज्य दरोबस्त पावले. घाट कोंकण, वरघाट, बालाघाट चालावा. सहा सुभे दक्षिणेंतील चौथाई व सरदेशमुखी चालावी. ऐसा तह जाला. त्याप्रमाणें चालावें. मातुश्री व कबिले तेथें राहिले ते येणें घडावें." ऐसे मतलब ते निवडोन यादी करून फौज घेऊन जाण्यास मुख्य प्रधान बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे सेनापति व संताजी भोंसले परसोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांचे पुत्र व पंवार विश्वासराव ऐसे सरदार [व] पन्नास हजार फौज नेमिली. त्यांस दररोज पन्नास हजार रुपये याप्रमाणें पंधरा लक्ष रुपये दरमहा पावावा ऐसें ठरावून मतलबाची यादी करून दिल्ही बितपशील:—

१. स्वराज्य थोरले कैलासवासी स्वामींचे वेळे प्रें॥ रायगड व वरकड कोट देखील करून घेणें. ठाणीं मागून घेणें. कलम.

१. खटाव. १ आकळूज. १ कासेगांऊ. १ मंगळवेढे. १ मिरज. १ पेडगांव. १ जुन्नरकिल्ले समेत. १ चौलसमेतकिल्ले. १ सांगोलें. १ नाशरें. १ चाकण. १ बेळगाऊ. १ कल्याणभिंवडी समेत किल्ले. कलम.

१ त्रिंबक मागोन घेणें. कलम.

१ तोफा नदर संस्थानी देतील त्यांची चौथाई करून घेणें— कलम.[३७]

१ चांदाचें राज्य कान्होजी भोंसले यांणीं साधिलें आहे तें स्वराज्यांत करून घेणें. कलम.

१सहा सुभे खेरीज गुजराथ, माळवा साधेल तेथवर साधणें—

नबाब बलोलखानाची दौलत फत्तेसिंग बावाचे नांवें करून घेणें. कलम.

१ मातुश्री व मदनसिंग देखील[३८] कबिले व दुर्गाबाई सेवक लोक मागोन घेणें. कलम.

१ पेशजी मतलब लिहून दिल्हे आहेत त्याचे फर्मान[३९] सनदा करून घेऊन येणें. १ कलम.

---

३७. हें कलम चिटणीस प्रतींत येथें नाहीं, पण पुढें आहे. येथें इंदूर प्रतींत "तोफे दरसंस्थानीं घेतील त्याची चौथाई" असें लिहिलें आहे. पण तो अपपाठ आहे. पुढें पृष्ठ ४१ टीप ४४ पहा.

३८. देखील=मध्ये ...

३९. फरमान=आज्ञापत्र, सनद. ह्या सर्व सनदा साताराच्या महाराजांपाशीं आहेत, परंतु त्यांत गुजराथ, माळवा, वराड वगैरे बद्दल मुळींच उल्लेख नाहीं असें ग्रांट डफ म्हणतात. सनदा महमदशहाच्या नांवाच्या आहेत.

१ कोंकणपट्टी देखील राजापुरी चौथसरदेशमुखी स्वराज्य व बरकड सांथेल त्याचे फर्मान पृथकाकारें करून घेणें— कलम.

१ सरदेशमुखी इनाम दर महालास एक गांव करून घेणें— कलम.

चंदी प्रांतीं राज्य गडकोट देखील करून घेण— कलम.

१ जयसिंग पालकर येतील तरि मागून घेणें— ४०कलम.

याप्रमाणें यादी करून दिल्ही. आणि सध्याच ठाणियांत मोंगलाई अमलाचे सुभे होते, व स्वराज्याचे जिमेचे४१ बाहेर राहून अमल घेत होते ते मोंगलाई ठाणीं सदरीं लिहिलीं तीं उठवून४२ दरोबस्त अमल स्वराज्याकडे यावा ऐसें सांगितलें. तें संक्राजीपंत यांणीं सैदास लिहून मतलबाची यादी तह ठरावून आणिला. व ठाणेदार यांस सोडचिठ्या आणून मोंगलाई अमल उठवून; दरोबस्त अमल स्वराज्याकडे मतलब दिल्लीहून व्हावयाचे तें करून तेथून देतों ऐसा तहनामा ठरावून पाठविला. शके १६३६ जयनामसंवत्सरे सन खमस अशर मया व अलफ. याप्रमाणें तह होऊन संक्राजीपंत यांणीं महाराजांस मेजवानी सर्व अष्ट प्रधान व सरदार व दरखदार व कारखानदार राजमंडळ यांस वस्त्रें जवाहीर यथायोग्य देऊन केली. महाराजांनींही पंतांस मेजवानी त्यांजकडील मुत्सद्दी कारकून व सरदारसुद्धां वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे बराबर दिल्हे. आणि औरंगाबादेस जाण्यास निरोप दिल्हा. ते निघोन गेले.

यानंतर फौजेची तयारी करून बाळाजी विश्वनाथ प्रधान व सेनापति, सेनासाहेबसुभा यांसि वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे देऊन सुमुहुर्तें डेरे देऊन जावयास निरोप दिल्हा. ते पन्नास हजार फौज गणती द्यावयाजोगी तयार करून औरंगाबादेस गेले. तेथें सैद यांणींही आपली फौज पन्नास हजार तयार करून डेरे दाखल झाले. महाराजांचे खर्चास फौजेस दरम्हा पंधरा लक्ष कराराप्रमाणें दिल्हा. सरदार गेले त्यांस मेजवानी वस्त्रें देऊन दिल्लीस लौकर जाऊन पोंचलें पाहिजे म्हणून दरमजल कूच करून जाऊन पोंहाचले. लढाई होऊन फरोखशाहास कैद करून डोळ्यांत सळई फिरविली. त्याचे पुत्र तख्तावर बसवून कारभार चालविला. महाराजांकडील मतलब करार करून सनदा स्वराज्य व चौथाई व सरदेशमुखी वगैरे यादीप्रमाणें चांदाचें राज्य व बहलोलखानाचें व चंदी याप्रमाणें दिल्या. कांहीं दिवस तेथें राहिले. ठेवून घेतले. मातुश्री व कबिले स्वाधीन केले. यानंतर पुन्हा पादशाही अमीर व महमदशहा कैदेंत होते, ऐसे मिळोन खान वगैरे राजकारण चाललें. त्यांत महाराजांकडील मराठी फौज

४०. हें कलम इंदूर प्रतींत मात्र दिलें आहे.

४१. ' जिमेचे ' किंवा ' मिमेचे ? '

४२. कोलापूर व इंदूर प्रतींत ' ठेवून ' असें आहे चिटणीस प्रतींत ' उ ' शोध घालून पाठीमागून घातलेली आहे. ' ठेवून ' असें प्रथमचें आहे.

प्रधान व सेनापति सेनासाहेब सैदाचे कुमकेस आले. हे अनुकूळ जाले यावांचून सिद्धीस मसलत जाणार नाहीं, म्हणोन राजकारण यांजकडेही केलें. सैद यांसही समजोन सावध होते. यांणींही सूचना केली, परंतु महमदशहा यांणीं कृत्रिम दंगा करून अलम अल्लीखान व हसन अल्लीखान सैद रस्त्यांतून स्वारी जात होते तेथें मारेकरी घालून गर्दी करून मारिले. गर्दी जाहली. महाराजांकडील सरदार फौज तयार होऊन निराळे उभे राहिले. सैद यांजकडील फौज तयार जाहली. त्यांत मिळोन कुमक करावी तरि सरदार मारिले गेले. महमदशहाकडीलही फौज सरदार राजकारणांत खान वगैरे होते ते तयार होऊन लढाई सुरू जाहली. त्यांत महमदशहा यांणीं महाराजांकडील लोकांचे वाटे जाऊं नये [ ऐशी ] ताकीद केली. यांसही सांगून पाठविलें. परंतु संताजी भोंसले सेनासाहेब सुभा यांणीं लढाईंत चालून घेतलें. सैदाचे फौजेचा मोड जाहला. तेथें संताजी भोसले यांस गोळा लागून [ ते ] पडले. सैदाची फौज मारून लुटून गारद केली. फरोकशहाचे पुत्र कैद करून आपण तख्तावर बसले. महमदशहा यांणीं महाराजांकडील प्रधान पंत व सेनापति, सेनासाहेब सुभा व सरलष्कर व सर्व सरदार यांस वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे देऊन बहुमान केला. संताजी भोंसले पडले असतां त्यांचे पुत्र राणोजी भोंसले यांणीं तरवार लढाईंत केली म्हणून त्यांस सवाई संताजी [ हा ] किताब दिला. शके १६४० महाराजांकडील मतलबाच्या यादी करून आपलें नांवें सनदा फर्मान स्वराज्य व चौथाई व सरदेशमुखीच्या करून दिल्ह्या. काबिले मातुश्री सोडलीं होतींच. दरमहाचा ऐवज सैदांनीं करार केला तो पावून बाकी राहिली ती फडशा करून दिल्ही. मनांत वजीर बसोन विचार केला जे, "पूर्वीं औरंगजेब शहाजादेपणांत वीस वर्षें जाऊन औरंगाबादेस राहिले होते. बादशहा झालियावरी आणखी २० वर्षें जाऊन दक्षण घ्यावी म्हणून दोन लक्ष फौजेनिशीं कैस्त[११] केली. दौलताबाद, विजापूर, भागानगर, बादशाया बुडविल्या. संभाजी राजे धरले. शिवाजी राजे वारले. व सर्व राज्य अमल सोडविला. परंतु त्यांचे धाकटे पुत्र राजाराम व त्यांचे पदरचे सरदार लोक यांणीं पुन्हा राज्य जसेचें तसें सोडविलें. मुलुख सर्व हिंदूचा व त्यांत माणूस मोठे पराक्रमी सर्व त्यांचेच आहेत. अधिक विशेष वाढले. हिंदुस्थान प्रांत व दक्षिण यांत सर्व हिंदूच आहेत. दहावा हिस्सा मुसलमान लोक नाहींत. हिंदूंचा उच्छेदच करून व त्यांणीं कटाक्ष लावून चालून परिणाम ठीक नाहीं. शेवटास जाणार नाहीं. तहानींच असावें व शाहूराजे यांणीं नेकी धरून पादशाही पाशीं कुमक केली. पुढेंही त्यांणीं कुमक राखावी." ऐसे सरदार यांशीं

११. कस्त=कष्ट, अतिशय मेहनत.

बोलणीं केलीं. आणि पूर्वी शिवाजी महाराज असतां जयपूरचे राजाचे विद्यमानें तह जाला तेव्हां चौथ व स्वराज्य व सरदेशमुखी वगैरे ठराव झाले त्या अन्वयें फर्मान देऊन निरोप फौजेस व सरदार यांस दिल्हा. "दक्षिणचे सुभ्याची कुमक सर्वकाळ राखावी व येथील लिहिलें जाईल तेव्हां कुमकेस फौज यावी," सांगितलें. फौजेचा दरमहा देशीं जाऊन पावत तोंपर्यंत हिशेब करून दिल्हा. प्रधान, सेनापति यांणीं मातुश्री कुटुंब देशीं जाणें वगैरे समजोन, फर्मान त्यांणीं आपली चालीनें कुमक राखावी, व सरदेशमुखीचें वतन त्या वतनाचे चालीनें व स्वराज्याचें जसें करून दिल्हें तसें करून घेऊन नजर वगैरे ठराव त्यांणीं लिहिले ते घेऊन निघोन आले. फर्मान तपशील:—

१ स्वराज्य पूर्वी शिवाजी महाराज यांणीं अमल बसविला व दिल्लीस जातां तहांत आला त्याप्रमाणें तळघाट, कोंकण, वरघाट, बालाघाट, दुतर्फा दरोबस्त देखील किल्ले ठाणीं सरदेशमुखी वतनी अमल पूर्वी शिवाजी महाराज यांणीं बसविला त्याप्रमाणें सहा सुभ्यांत वतन चालवें. फर्मान.

१ तोफा नजर मोंगलाईंत येईल त्याची चौथाई घ्यावीसें ठरलें.[४४]

१ सहा सुभे दक्षिणची चौथाई वगैरेचा अमल स्वराज्याचा अमल व गुंजराथ निराळ्या ताकीदी. चौथाईचा फर्मान.

१ कान्होजी भोंसले यांणीं गोंडवण, वऱ्हाड, कटक अमल बसविला त्याप्रमाणें चालावें.

१ बहलोलखान यासि ताकीद कर्नाटक सुभा फत्तेसिंग भोंसले याजकडेस देणें.

याप्रमाणें ठरावांत आणोन कागदपत्र दिल्हे. ते घेऊन प्रधान व सेनापति, सेनासाहेबसुभा निघोन आले. येतां जयपूर, जोतपूर व उदापूर यांचीं राजकारणें आलीं. त्यांच्या भेटी घेऊन, त्यांस बहुमान करून, त्यांचीं कामें करून देऊन, महाराजांशीं तह चालवायाचें करून, त्यांणीं महाराजांस बहुमान वस्त्रें, जवाहीर, हत्ती घोडे दिल्हे व उत्तम पदार्थ ते घेऊन, नजर महाराजांचे ऐवजांत चौथाई ऐवज कसर राखून, खजिना घेऊन, महाराजांपाशीं येऊन पावले. महाराज पुढें सामोरे जाऊन बहुत सन्मान केला. त्यांणीं नजरा केल्या. त्यांस चादरा व दुपेटे शेले सरदार मुत्सद्दी कारकून यांस घातले. ज्यांणीं कामें केलीं त्यांस बक्षिसें सरंजाम, गांव, इनाम वगैरे महाराजांनीं दिल्हे. खजिना व संस्थानी यांजकडील मेजवान्या व पादशहा यांणीं महाराजांस बहुमान दिल्हे ते सर्व सरदार प्रधान आदिकरून महाराजांस निवेदनें[४६] केलें. मातुश्रींची भेट

४४. येथें दोन्ही प्रतींचा पाठ असाच आहे. मागें पृष्ठ ३८ टीप १७ पहा. तोफा बहुधा युरोपियन लोकांकडून नजर येत असत.

४५. मागें पृष्ठ ३७ टीप ३१ पहा.

४६. निवेदन करणें=अर्पण करणें.

जाहली यावरून बहुतच संतोषी होऊन कृतार्थ जाहले. करंडें व रांजणगांव वगैरे पांच महालचें वतन सरदेशमुखीचें प्रधान पंत यांस करून दिल्हें. इनाम गांव दिल्हे. सेनापति यांसही वतन इनाम गांव दिल्हे. त्यांजपाशीं दमाजी गायकवाड बहुत शहाणे कर्ते व मर्द होते, त्यांणीं मेहनत केली म्हणून बहुमान देऊन समशेरबहादर किताब दिल्हा. सेनापतीकडील कारभार देऊन वाढविलें.

किलीजखान निजाम उल्मुलुख यांस महमदशहा यांणीं फिरून सहा सुभे दक्षिणेचे मोंगलाई अमलाचा सुभा सांगोन फिरून रवाना केले. ते येऊन पावले. महाराजांशीं दिल्लीहून तह ठरून आला त्याप्रमाणे चालल्यानंतर जाधवराव यांणीं अमलांत खटले पाडिले. यावरून अमल उगवण्यास सरलष्कर यांजकडील फौज जाऊं लागली. यावरून फौज येती ते दाबून राखावी ऐसा विकल्प निजाम उल्मुलुख यांनीं चित्तांत आणून महकूबसिंग सरदार होते ते व आपली जमेत चालून पुढें आले. महाराजांनीं सरलष्कर वगैरे फौज पाठविली. त्यांची यांची लढाई जाहली. महकूबसिंग, जाधवराव यांचा मोड जाहला. धारराव प्रभू कळंबेकर यांणीं शिपायगिरी बहुत केली. ते कामांस आले. त्यांची सरदारी जागिरी आपाराव त्यांचे कनिष्ठ बंधु यांजला दिली. महकूबसिंग मोड होऊन परत गेले.

कान्होजी आंगरेचा बाळाजीपंत यांचे विद्यमानें तह ठरला त्याप्रमाणें बहुत निष्ठेनें सरकारचा ठरावाचा ऐवज देऊन चालूं लागले. आणि महाराजांचे दर्शनास यावयाचें म्हणून पत्रें पाठविलीं जे, "खंडो बल्लाळ चिटणीस यांस पाठवावे दर्शनास यावयाची खातरजमा व्हावी." यावरून दर्शनास येण्याविषयीं अभयपत्र पाठवून खंडो बल्लाळ यांची रवानगी केली. ते जाऊन सर्व बोलणीं ठरावांत आणून खातरजमा करून दर्शनास आंगरे यांस घेऊन आले. महाराजांची स्वारी श्रीजेजूरीस देवदर्शनास गेली होती तेथें येऊन पोंचले. त्यांचा सन्मान केला. बादली चादर घातली. नजर [ त्यांणीं ] केली. व बंदरी जिन्नस उत्तम पदार्थ बहुत आणिले व खजिना ते सर्व महाराजांस नजर केली. तेथें शिमगी पौर्णिमा जाहली. प्रतीपदेस कूच होऊन निघाले तेव्हां आंगरे यांणीं पांच रंगांचा गुलाल व रंगांचें सामान बहुत आणिलें. दरकूच हत्तीवर रंग व गुलाल भरून पांच चार कोश मजल करावी. तेथपर्यंत तख्तराव्यांवर नाच व रंग गुलाल खेळत मुक्काम पर्यंत चालावें, ऐसें करीत पंचमीस सातारां येऊन पावले. जेजूरीपासून सातारापर्यंत रस्ता गुलालांनीं भरला ऐसें जाहलें.

---

४७. कामास आले=लढाईत पडले.

४८. तख्तरावा=एकाशीं एक अनेक फळ्या जोडून एक जोडफळी करितात ती. ही बैलांच्या गाडीवर अगर मनुष्यांच्या डोकीवर ठेवून त्याजवर नृत्य वगैरे चालावयाचें.

ऐसें बहुतच सफाई बोलणीं होऊन महाराजांस डेरियास नेऊन पंचमीचा समारंभ करून वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे, ऐसे देऊन अष्टप्रधान व दरखदार व सरदारसुद्धां वस्त्रें बहुमान देऊन मेजवानी केली आणि सुभ्याच्या सनदा वस्त्रें बहुमान महाराजांनीं दिल्हा तो घेऊन प्रांताचे बंदोबस्तास गेले. शके १६४०. सन तिसा अशर मया व अलफ.

बाळाजी विश्वनाथ प्रधान पुरंदर किल्ला राहण्यास जागा घेऊन सासवड येथें व कांहीं सातारियांत याप्रमाणे राहिले. शरीरीं व्यथा जाली. राज्याभिषेक शके ४६ विकारीसंवत्सरे शालीवाहन शके १६४१ सन अशरीन मया व अलफ यांत निवर्तले. सहा वर्षें प्रधान पद केलें. त्यांचे पुत्र वडील बाजीराव बल्लाळ व धाकटे चिमणाजी बल्लाळ ऐसे दोन होते. प्रबुद्ध होते. त्यांस व अंबाजी पुरंदरे यांस आणवून सुमुहूर्ते त्याच *शकांत प्रधान पदाचीं वस्त्रें यथापद्धति बाजीराव यांस दिल्हीं. चिमणाजी बल्लाळ यास पंडित ऐसा किताब [ व ] सरदारीचीं वस्त्रें दिलीं. पुरंदरे यांस मुतालिकीचीं वस्त्रें दिलीं. वरकड दरखदार[५०] त्यांजकडील व सरकारी[५१] यांस वस्त्रें बहुमान दिलीं. चिटणीस आवजी निळकंठ बराबर दिल्हे. बाजीराव यांणीं महाराजांस सर्व मुत्सद्दी व सरदार सुद्धां मेजवानी केली व नजर खजीना दिला. चिमणाजी बल्लाळ यांस दमाजी थोरात[५२] याचा सरंजाम करार करून सनदा दिल्ह्या व चिमणाजी दामोदर[५३] याजबद्दल सरंजामही त्यांस दिल्हा. सासवडास राहणें सोय न पडे याजवरून म्हणोन सुपें येथें राहण्यास जागा करून राहिले. [ तेथें ] कांहीं दिवस राहिले. यानंतर कांहीं दिवस पुणें सुभा आपलेकडे करून घेऊन पुण्यास जाऊन राहिले. तेथें वाडा बांधावयासि काम लाविलें. चिरेबंदी कोट बांधावयास प्रारंभ केला. तें महाराजांनीं पत्रें व हुजरे पाठवून किल्ला, गढी बांधूं नये म्हणोन मना केलें. यावरून फिरून परवानगी घेऊन राहिलें काम तें वीटबंदी केलें.

खंडेराव दाभाडे सेनापति वारले. त्यांचे पुत्र त्रिंबकराव दाभाडे आणून नजराणा वगैरे करार करून सेनापति पदाचीं वस्त्रें बहुमान यथापद्धति दिल्हीं. पिलाजी

---

* त्याच शकांत कीं शार्वरी वत्सरीं ?

४९. दरखदार=चिटणीस, फडणीस, पोतनीस वगैरे कामगार. हे प्रत्येक सरदारापाशीं व प्रत्येक सुभेदारापाशीं असावयाचे. राजाच्या चिटणिसानें पेशव्यांकडे चिटणीस नेमावा, पेशव्यांच्या चिटणिसानें होळकराकडील चिटणीस नेमावा, होळकराकडील चिटणिसानें त्यांचे मामलतदाराकडे चिटणीस पाठवावा, याप्रमाणें इतर दरखदारांच्या नेमणुका होत असत.

५०. पेशव्यांकडील व महाराजांकडील.

५१ ज्याणें बाळाजी विश्वनाथाशीं बेइमान केलें होतें व जो शाहूस जुमानीत नव्हता. मागें पृष्ठ ११ व २६।२७ टीप १०।११ पहा.

५२. हा पूर्वीचे पेशवे पिंगळे यांच्या पदरचा सरदार खानदेशांत शाहूस येऊन मिळाला तो.

५३. सासवडास पेशव्यांचा वाडा आहे तसें सुपें येथें कांहीं आहे काय ?

गायकवाड त्यांचे पदरीं सरदार बहुत उमदे निघाले [ होते ] त्यांस गुजराथ सुभा काठेवाड वगैरे खंडणी अमल घेणें काम सांगितलें. खंडेराव दाभाडे यांची स्त्री उमाबाई बहुत शहाणी [ होती ] तिचे अनुमतें सरकारी सुभा व सरदारी चालवावीसें करून दिल्हे.

[ तसेंच ] परशराम त्रिंबक प्रतिनिधि यांस शरीरीं पीडा होऊन वारले. शके १६४० विलंबीनाम संवत्सरे ज्येष्ठ शुद्ध ८ सोमवार. यानंतर ज्येष्ठ वद्य पंचमीस श्रीपतराव प्रतिनिधि यांस वस्त्रें जाहलीं.

बाजीराव बल्लाळ व चिमणाजी बल्लाळ बहुत कर्ते शहाणे [ निघाले. ] राज्यवृद्धीची उमेद बहुत धरून बहुत पराक्रम करून दाखवावा, महाराजांची कृपा संपादावी म्हणोन "आपणांस हिंदुस्थान चौथाई सरदेशमुखी साधण्याचा सुभा सांगावा." माळव्याचा अंमल तहत आला आहे. त्यास विश्वासराव पवार धारेस ठाणें घालून आहेत त्यांणीं व आम्हीं मसलत करीत जावी. गुजराथ प्रांत सेनापतीकडे त्यांची व आपली हद्द करून द्यावी. म्हणोन विनंति केली. "पवार यांजकडे हिस्सा काय, आपणांकडे [ काय, ] त्यांत फौजेचा खर्च यास नेमून सरकारांत रसद काय, याचा ठराव करून सनदा द्याव्या " बोलले. हें महाराजांनीं ऐकून बाजीराव यांजवर बहुत संतोषी जाहले. महाराजांस हिंदुस्थान साध्य करावयाचे बहुत मानस यावरून प्रतिनिधि व सर्व मुत्सद्दी जमा करून विचार पुसिला. तेव्हां श्रीपतराव प्रतिनिधि यांणीं, "पादशहाचा तह जाला [ आहे ] व किलीजखान नबाब सुभ्यांत तह चालला आहे. सुभा व फौज नजिक प्रांत लागला आहे तो बिघाड होऊन तूर्तच मसलैत प्राप्त होईल. स्वामींचा मनोदय हिंदुस्थान साध्य करण्याचा आहे तोही घडोन येईल. आधीं कर्नाटक प्रांत थोरले महाराजांनीं साध्य केलेला गेला आहे तो साध्य सर्व फौज पाठवून करावा. नंतर ही मसलत करावी. ऐसें आमचे विचारें दिसते," बोलले. यावरि ते समयीं बाजीराव यांणीं उत्तर केलें कीं, " प्रतिनिधि अशी मसलत काय देतात ! पादशाही कमजोर

---

५४. 'दमाजी' असें असावें. दमाजीनें बाळापूरच्या लढाईत तरवार केली त्याबद्दल सेनापतीच्या शिफारशीवरून त्यांस 'समशेर बहादर' हा किताब मिळाला (१७२१) पण पुढें थोडक्या दिवसांनीं तो मृत्यु पावल्यावर त्याचा पुतण्या पिलाजी याजकडे त्याचें पद दिलें.

५५. उमाबाई—ही त्रिंबकराव दाभाड्याची स्त्री असून पतीचे मरणोत्तर (१७३१) तिनें शहाणपणानें कांहीं दिवस कारभार चालविला, असें ग्रांट डफ म्हणतात. 'त्रिंबकरावाची स्त्री' हें बखरीच्या लेखाविरुद्ध आहे. आम्हांस दाभाड्यांची हकीकत मिळाली आहे त्यांतही " खंडेराव दाभाडे यांची स्त्री उमाबाई होती त्यांजपाशीं बाजीराव यांजला घेऊन येऊन महाराज बोलले कीं, ' त्र्यंबकराव तुझा पुत्र व बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे यांचा भाऊपणा होता त्यास हा [ बाजीराव ] ही तुझाच पुत्र आहे " असें लिहिलें आहे.

५६. मसलत=स्वारी, युद्ध प्रसंग.

जाहली [ आहे. ] कांहीं जीव राहिला नाहीं. बखेडे बहुत जाले आहेत. पादशाहा आमचे कुमकेनें पादशाही रक्षावी असें इच्छून आहेत. यांतच त्यांचेही बखेडे मोडावे. आपला स्वराज्य अंमल पूर्वी बसला नाहीं तो बसवावा. किलीजखान नजीक, त्याचा तह बिघडून खटला करतील याचा हिसाब काय धरावा ! [ असें म्हटलें तर ] राज्य कसें करावें ! आणि थोरले महाराज यांणीं जातीनें औरंगजेब शाहजादेपणांत येऊन दौलताबादची पादशाही घेऊन औरंगाबाद बसवून सुभा करून राहिले, त्याचा हिसाब न धरितां विजापूर, भागानगर पादशाहींतील अंमल बसविला. व त्यांचे[५७] सुभ्यांतील अंमल घेतला. यानंतरही संभाजी महाराज यांणीं सर्व दौलत फौज बुडाविली, महाराज वारले, असे प्रसंगीं औरंगजेब जातीनें येऊन दोन्ही पादशाही घेऊन संभाजी महाराजांस धरून विज्वर[५८] प्रसंग केला. महाराज[५९] त्यांचे नजरबंदींत गेले. राज्य व स्थळें सर्व घेतलीं. दोन लक्ष फौजेनशीं बंदोबस्तास आपण हिंदुस्थान दिल्लीचें राज्य सोडून या प्रांतीं राहिले. त्याचा हिसाब न धरितां राजाराम साहेब चंदीस जाऊन चार सुभे[६०] पंचवीस पंचवीस हजारांचे करून तेथून रात्रंदिवस मसलत करून लढाया मारून अंमल उठवून[६१] नेला. पुढें पादशाहांनीं चंदीस अडचण केली तेव्हां पादशाहा या प्रांतीं असतां देशीं येऊन हिसाब न धरितां औरंगाबाद मारिली, अंमल बसविले, राज्य व किल्ले स्थळें साध्य केलीं. हें राज्य गेलें तें श्रीकृपेनें पुन्हा साध्य जालें. स्वामी पादशाहींतून अनायासें करून राज्यावर येऊन दैवबान मोठीं माणसें पदरीं होऊन पादशहाची कुमक करावी, पादशहा स्थापावे, ऐसें होऊं लागलें. पूर्वीं मोठीं मोठीं कार्ये वडिलीं केलीं तशीं न करावीं तरि मोठीं पदें कशास करावीं[६२] ! आम्हांस सनदा मात्र द्याव्या. फौज खजिना सर्व स्वामींचे चरणाचे प्रतापेंकरून सिद्ध करितों. राज्य साध्य करितों. किलीजखान याचाही शह[६३] राखून हिंदुस्थानची मसलत [ करितों. ] दोन्ही आम्ही आटोपतों. कर्नाटकची मसलत करणें त्यास पादशाही बुडविली [ आहे. ] पूर्वींचीं राज्यें विजापूर, भागानगर, यांजखालील मुलूख साध्य जालेच आहेत. हे घरांतील मसलत आहे. हुजुरात व मोठे सरदार यांतील कोणी तरी रवाना होऊन मसलत जाली म्हणजे सहज साध्य होईल. हे प्रतिनिधींनीं मसलत संभाळावी. थोरले महाराजांचा संकल्प हिंदुस्थान काबीज करावें ऐसा राहिला.

---

५७. औरंगजेबाचे.

५८. विज्वर=जिवावरचा, शेवटचा.

५९. शाहूस उद्देशून.

६०. सुभे=सुभेदार, सरदार.

६१. ' उगवून नेला ' कोलापूर प्रतीचा पाठ आहे. तेथें 'राजारामानें' वसूल घेतला, असा संबंध लाविला पाहिजे. वर ' त्याणें मोंगलांचीं ठाणीं हांकून लाविलीं ' असा अर्थ होतो.

६२. हें बोलणें प्रतिनिधीस खूप लागलें असावें.

६३. त्याच्या हल्ल्याचा बंदोबस्त करून.

त्यासाठींच स्वामींचा अवतार उदय जाला आहे. पुण्यप्रतापही तसाच आहे. यास्तव आम्हीं हें साध्य करावें आणि संकल्प शेवटास न्यावा. पादशहांनीं आपण होऊन बलावून नेऊन तह करावा ऐसे दिवस श्रीने प्राप्त केले. त्यांत बाळाजीपंत नाना जाऊन सर्व राजकारणें हिंदुस्यानचे राजेरजवाडे यांची करून सिद्धता जाली आहे. महाराजांचा प्रताप जें कार्य मनीं धरिलें तें घडोन यावें ऐसा आहे. यास्तव या समयीं हा उद्योग करावा हें उत्तम आहे." असें बोलले. यावरून महाराज बहुत संतुष्ट होऊन बोलले जे, "बाळाजीपंत नानांच्या उदरीं तुम्ही जन्मलां तें युक्त आहे. तुम्हांसारिखे कर्ते पदरीं असतां हिमालयापलीकडीलही दुसरें किन्नर* खंडीचें राज्य साधतां येईल! मग या मसलतीचें काय अशक्य आहे? तुम्ही हिंदुस्थान प्रांतीं जावें. इकडील सर्व सरदार व हुजुरात व मानकरी फौज आहे, तेव्हां निजाम उल्मुलूख यांणीं शेखी केलियास पाहतां येईल व कर्नाटक प्रांतीं ही फौज रवाना करून सोडितां येईल."

ऐसें सांगोन महाराजांनीं बाजीराव यांस वस्त्रें बहुमान व सनदा देऊन निरोप दिल्हा. अंबाजीपंत पुरंदरे हुजूर ठेविले, [ त्यांणीं ] खंडो बल्लाळ चिटणीस यांचे विद्यमानें आपलीं बोलणीं बोलावीं ऐसें करून देऊन पुण्यास निघोन गेले. आणि फौजेची तयारी करून, पोक्त सामान तोफखाना सुद्धां जमाव करून व गारदी लोक पायदळ तोफखान्याचे रक्षणास ठेवून निघोन माळव्यांत गेले. तेथील अंमल उठवून उज्जनीस दयाबहादूर सुभा पादशाही होता तो चालून आला त्याशीं लढाई दिल्ही. त्याचा मोड करून उज्जनी घेऊन तेथें ठाणें व प्रांतांत ठाणें घालून माळवा सर केला. आणि पुढें जाऊन तमाम राजेरजवाडे यांच्या खंडण्या ठरावून बुंदीलखंडचे राजे यांची खंडणी घेतली. बुंदीलखंडचे राजे यांचा स्नेह भाईचारा करून त्या प्रांतीं एक वर्ष छावणी केली. किल्ले व ठाणीं त्या प्रांतीं घेतलीं. बहुत युद्ध प्रसंग पडले ते केले. जातीनें शिपायगिरी करून तरवारा माराव्या [ असें केलें. ] बहुत द्रव्य मेळवून, खजिना करून, फौजेस रोजमुरे नालबंदी देऊन फौज हुशार केली. ठाणीं प्रांत किल्ले घेतले त्यांचे बंदोबस्तास वीस हजार फौज नेहमीं माळवा प्रांतीं रहावी ऐसें केलें. राणोजी शिंदे कण्हेरखेडकर व मल्हारराव होळकर धनगर हे सरदार व पागे होते. उभयतां मसलतींत व लढाईंत बहुत पराक्रमी निघाले. त्यांस शिंदे यांस उज्जनीचा सुभा व होळकर यास इंदुरचा [ सुभा ] सांगोन जो

---

* किन्नरखंड=किन्नरांचा देश. हा हिमालयाचे पलीकडे आहे असें समजतात. ग्रांटडफ् यास ' कुन्नर ' खंड म्हणतात.

६४. " उगवून " कोलापूर प्रत.

६५. राजा गिरधर याचा पवाराशीं एका लढाईत वध ( १७२९ ) झाल्यावर त्याचा संबंधी दया बहादर याची माळव्याचे सुभ्यावर नेमणूक झाली. हे नागर ब्राह्मण होते.

प्रांत साध्य केला त्याची वांटणी सरकारचे विश्वासराव पवार व हे उभयतां यांचे फौजेस खर्चाची नेमणूक व सरकार हिस्सा ऐसें करून देऊन आपण परत पुण्यास येऊन महाराजांचे दर्शनास आले. महाराजांस सर्व निवेदन केलें. पुढें सामोरें जाऊन महाराजांनीं सन्मान केला. संतुष्ट जाले. शिपाई लोक व सरदार व मुत्सद्दी यांणीं कामें केलीं त्यांस बक्षिसें दिलीं. हिंदुस्थानी राजे यांच्या भेटी होतात त्यांस सोन्याच्या दांडीच्या चवऱ्या व सोन्याचे काठीचे चोपदार असतात, बराबरीनें भेटी घेणें तो आपणांस रुप्याचें सामान आहे, येविशीं विनंति केली. यावरून महाराजांनीं सोन्याचे दांडीची चवरी व सोन्याचे काठीचे चोपदार यांस देऊन बहुमान वाढविले.

यानंतर कर्नाटक प्रांतींचा बंदोबस्त व्हावा म्हणोन चंदावरीं तुळजाराजे[६६] होते त्यांस पत्रें लिहिलीं जे, " इकडून फौजा रवाना करितों. तुम्हीं तिकडून फौज तयारी करून कुमकेस यावें. तुम्हीं फौजेचा खर्च वाळगून रिकामे पैके खर्च केले. चंदी वगैरे राज्य कां सोडविलें नाहीं ? उपभोग कां न केला ! असो. या उपरि तरि रिकामें लोकांपासून खाववूं नये. कुमक करावी. " म्हणोन लिहिलें. फत्तेसिंग भोंसले यांजकडे कर्नाटक सुभा सांगावा व सरदार वाढवावे, ऐसें सिद्ध करून बाजीराव प्रधान व प्रतिनिधि व दाभाडे सेनापति व रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा व सरलष्कर यांस फौजेनिशीं बोलावून सर्वांनीं फत्तेसिगबावा बराबर जावें, त्यांचे विचारांत चालावें, " ऐसें सांगितलें. " मसलत करून कर्नाटक प्रांतींचे पाळेगार मांडलीक राजे यांच्या खंडण्या पूर्वील तहाप्रमाणें घ्याव्या, स्थळें किल्ले सोडवावे, " ऐशी आज्ञा केली. ती सर्वांनीं मान्य केली. तयारी करून पन्नास हजार फौजेनिशीं हे सर्व सरदार बराबर देऊन फत्तेसिंग भोंसले याची रवानगी केली. संताजी घोरपडे या राज्यांतील पुरातन सेनापति त्यांचे पुत्र वगैरे पनाळ्याचे संभाजीराजे यांचे कईपपीं[६७] राहिले. पिराजी घोरपडे त्यांचेच घराण्यांतील मुरारराव घोरपडे गुतीचें संस्थान राखून त्या प्रांतीं राहिले होते. त्यांसही पत्रें महाराजांनीं दिलीं होतीं जे, " तुम्ही सामान सुद्धां सरकारचे फौजेंत येऊन सेवा करून दाखवावी. " तेही आपलें सामान घेऊन येऊन भेटले. तमाम पाळेगार सुरापूर, चित्रदुर्ग, कनकदुर्ग वगैरे गदग, लक्ष्मेश्वर यांजपासोन पूर्वीचे ठरावाप्रमाणें खंडण्या घेतल्या. आणि पुढें सालाबाद देत जावें असें केलें. ज्यांनीं मगरूरी केली त्यांचे प्रांतास व त्यांस जरब दिली. हुजूरचीं स्थळें, ठाणीं, किल्ले पहिले होते ते सोडविले. आणि

६६. ( १ ) वेंकाजीचा ( २ ) तुकोजी. त्याचा ( ३ ) बावासाहेब. त्याचा राखपुत्र ( ४ ) प्रतापसिंह ( राज्य वर्षें दहा. ) त्याचा व- डील पुत्र ( ५ ) तुळजोजी राजा झाला. वर्षे ११.

६७. कश्यपीं=कच्छपीं=स्वाधीन.

पुढें त्रिचनापल्लीस गेले. तेथें दादखानें सुभा होता. त्यानें पुढें येऊन लढाई दिली व ठाणें भांडविलें. त्रिचनापल्लीनजीक जाऊन मोर्चेबंदी केली. गोळ्यांची मारगिरी करून हल्ला करून संस्थान घेतलें. तें फत्तेसिंगबावा यांनीं मुराराव घोरपडे यांचे स्वाधीन केलें. बहुत द्रव्य खजीना घेऊन फत्तेसिंग बावा परत आले. महाराजांस येऊन भेटले. महाराजांनीं सन्मान केला. सर्व खर्जाना व जालें वृत्त सर्व महाराजांस निवेदन केलें. ते समयीं महाराजांनीं प्रश्न केला जे, "प्रधान व सेनापति तुमचे आज्ञेंत चालावे ऐसें करून देऊन रवाना केले. पराक्रम करून फत्तेही पावला. त्रिचनापल्ली सारिखें संस्थान सोडविलें तें दुसरियाचे स्वाधीन करून या प्रांतीं कां आलां? संस्थानीं राहून मोठीं माणसें व फौज जमा करून त्या प्रांतींचीं स्थळें व दौलत चंदी वगैरे संस्थानें सोडवावीं, प्रधान सेनापति इकडील कार्यभागास रवाना करावे, ऐसें कां जालें नाहीं?" ऐसें विचारितां बावांस उत्तर देणें घडलें नाहीं. यावरून बाजीराव प्रधान यांणीं विनंति केली जे, "त्या प्रांतींचें जालें वर्तमान वरचेवर लिहीत गेले. त्या प्रांतीं राहूनही कार्ये करावीं ऐशी आज्ञा जाली नाहीं. तेव्हां राहतों म्हणून लिहावें अगर रहावें तरि महाराजांचे मनांत विकल्प जाईल कीं, यांस पृथक् राज्य करावें अशी दौलतीची इच्छा झाली. जितकी सेवेशीं आज्ञा जाली तितकी करून हुजूर जावें, पुढें जशी आज्ञा होईल तसें करावें, ऐसें आमचे सर्वांचे विचारें होऊन पायांपाशीं निघोन आले." यांवरून बाजीराव यांजवर महाराज संतोषी जाहले. प्रधान व सेनापति निरोप घेऊन पुणें व तळेगांव यांस निघोन गेले. हे मसलत शके[६९] १६४६ विश्वावसुनाम संवत्सरे सीत अशरीन मया व अल्लफ यांत झाली.

या समयांत बुंदिले राजे यांचे भाऊपणियांत कलह प्राप्त जाला. तेव्हां बुंदिले यांनीं बाजीरावास पत्र लिहिलें जे, "नबाब किलीजखानें पायागड प्रांतीं आले आहेत त्यांचा मनसबा कलहांत आपण मन घालून राज्यहरण करावें ऐसा आहे. ऐसे समयीं आपण अति त्वरेनें येऊन पावावें. आपण येऊन कलह तोडावा." ऐशीं पत्रें आलीं तीं व महाराजांस विनंति लिहिली जे, "आज्ञा आलियास तयारी आहेच. निघोन जातों." यावरून महाराजांनीं अति त्वरेनें जाऊन उभयतांचा कलह यथामार्गें तह करून देऊन सोडावा." [ असें कळविलें. ] यावरून तेच समयीं जाऊन सिद्ध करून मातबर मजली करीत माळव्यांत जाऊन

६८. हा दादखान कोण? ग्रांट डफ म्हणतात हा चंदासाहेब होय. त्यास दक्षणी लोक हुसेन दोस्तखान असें म्हणत. पण ही स्वारी १७४० मध्यें झाली.

६९. शके १६४७ म्हणजे इ० सन १७२५ या वेळीं कर्नाटकांत स्वारी झाल्याचें इंग्रजी इतिहासांत कोठें नाहीं. वर टीप ६८ पहा.

७०. हा किलीजखान नव्हे. अलाहाबादचा सुभा महंमद बंगश हा होय.

तिकडीलही फौज बराबर घेऊन बुंदीलखंडास पोहोचले. आणि उभयतांची मध्यस्ती करून, कलह तोडून, विभाग करून दिल्हे. यावरून ते उभयतांही संतुष्ट जाले. हें राज्य किलीजखान याचे हातीं जात होतें तें रक्षिलें, मोठे प्रसंगीं अलद येऊन पावले, म्हणून "तिसरे बंधुच तुम्ही आहां. दोन भाग आमचे. यांत तिसरा भाग तुम्हांस उभयतांस देतों." [असें] म्हणून झांशी वगैरे तालुका तिसरा भाग यांस दिला. तेथें फौज कांहीं व सुभा ठेवून विजयी होऊन परत महाराजांचे दर्शनास यावयास निघाले.

ते समयीं नबाबाचे चित्तीं आलें कीं, ही मसलत आम्ही करणार होतों तों ते येऊन साध्य करून चालले. यांसि लढाई देऊन बुडवावें. परंतु सेनापति व हे एक होतील. जाले असतां जमाव भारी होऊन जड पडेल. [सेनापतीकडे] राजकारण पाठविलें जे, "तुम्हीं अलग असावें. तुमचे मतलबास आम्ही अनुकूळ होऊं." तेव्हां सेनापति यांचेही मनांत दुर्बुद्धि आली. खंडेराव दाभाडे सेनापति वारले. शके १६५०[71] यांतें त्रिंबकराव यांस सेनापति जाली होती. त्यांणीं विचार मनांत आणिला जे, "माळवा प्रांतीं बाबती सरदेशमुखीचा मामला आपलेकडे असोन हे या प्रांतीं स्वारी कारितात. हिंदुस्थान आपण काबीज करावें तें हे करीत चालले आहेत." ऐसें चित्तीं आणोन नबाबापासोन कांहीं द्रव्य घेऊन अनुकूळ त्यांस जाले. हे बातमी बाजीराव यांस कळली. सेनापति सरकारचे पदरचे मातबर सरदार असोन हे बुद्धि धरिली आहे, म्हणून महाराजांस वर्तमान लिहिलें. यावरून महाराजांनीं आज्ञापत्र पाठविलें जे, "तुम्हीं त्या मार्गे येऊन सेनापति यांस बुद्धिवाद करून समजोन सांगून येतां बराबर घेऊन यावें. येथें उभयतांचा तह करून देऊन एक विचारें चालत ऐसें करितां येईल." यावरून बाजीराव त्या मार्गे येत असतां, सेनापति चालून पुढें आडवे जाले जे "तुम्ही आमचे तालुक्यांत येऊं नये." ऐसें लिहिलें. तिकडून नबाबही चालून पुढें आले. याजवरून जलदी करून बाजीराव पुढें आले. सेनापतीची फौज चाळीस हजार, यांजपाशीं पंचवीस [हजार.] "याचा विचार कसा करावा? या समयीं सेनापति विरुद्ध करून नबाबाहातीं आमची फौज बुडवितात. सरकारचा बदनैक्षा[72] होतो. त्या अर्थीं आधीं सेनापतींनीं विरुद्ध केलियास लढाई यांशींच देणें प्राप्त आलें. सरकारची आज्ञा आणवणेस अवकाश पडत नाहीं." म्हणोन आपले फौजेंतील धारकरी कितीं हे निवड केली. व त्यांचे फौजेंत किती. हे बातमी आणितां आपणापाशीं त्यांहून अधिक माणसें कामाचीं आहेत व महाराजांचे पायाशीं सेनापतीनें बदनेद[73] धरिला, तेव्हां त्यास यश कदापि यावयाचें

71. हा शक बरोबर नाहीं. शके १६४२ व ४३ असावें.

72. बदनक्षा=अपकीर्ति, दुर्लौकिक.

73. बदनेद, बदनियत=अनीति, हरामखोरपणा.

नाहीं म्हणोन तसेच पुढें चालून आले. " आम्हांस सरकारी प्रांतांत उपद्रव करावयाचा नाहीं. नबाब फौज सुद्धां पिच्छावरी आहेत याजकरितां त्या मार्गें जाणार, " म्हणोन लिहिलें असतां त्रिंबकराव लढाईचा इरादा करून चालून आले. आपण जातीनें हत्तीवर बसून युद्धास प्रवर्तले. तीन प्रहर पर्यंत लढाई जाली. दोहींकडील नामी माणसें रणांत बहुत पडलीं. सेनापति हत्तीवरून तिरंदाजी करितां करितां बोटांचीं सालें गेलीं. ऐशी लढाई बहुत तारफेची जाहली. बाजीराव यांणीं धारकरी यांजबराबर जातीनें घोडा घालून तरवार केली. नामी लोक निवड करून हत्तीपर्यंत जातीनें चालून घेतलें. सेनापतीचे फौजेचा मोड होऊन पळूं लागले. त्रिंबकराव जातीनें आडून उभे राहिले. लोक थोडे राहिले. हत्तीवरील महाद पडला असतां जातीनें पायानें हत्ती चालवून तिरंदाजी केली. तेव्हां सांडणीस्वार बाजीराव यांणीं पाठविला जे, " अशी लढाई शत्रूशीं करून महाराजांस संतोषी करावें ते आपणांस कशास पाहिजे ! आम्ही लढाई तहकूब करितों आणि भेटीस येतों, " असें सांगून पाठविलें. परंतु वीरश्रीस पडून तसाच हत्ती पुढें चालविला. बाजीराव यांणीं आपले लोकांस ताकीद केली कीं, " सेनापतीस कोणीं जायां करूं नये. " परंतु इतकियांत, होणारानुरूप, सेनापतीच्या कपाळास गोळी लागली. ठार जाले. हें पाहून बाजीराव मागें सरून फौजेंत लूट अथवा पाठलाग करूं नये, बुणगें लुटूं नये, हत्ती घोडे कोणी घेऊं नये, पाडाव जाहलें असेल तें सोडून द्यावें, म्हणोन सरून जाऊन राहिले. आणि मातबर मजली करून जावें असें केलें. सर्व वर्तमान महाराजांस लिहून पाठविलें. आणि महाराजांस येऊन भेटले. सर्व वृत्त समजाविलें. महाराजांनीं चित्तीं आणिलें जे. " अविवेक करून नबाबांनीं राजकारण केलें. दुर्बुद्धि धरून आगळीक करून आपणांतच लढाई केली. त्याचें फळ जाहलें. परंतु मोठे माणूस पदरचे व्यर्थ जायां जाहले. जाली ते गोष्ट पुनः येत नाहीं. पुढें उभयतांचेही मनास आणोन करणें तसें करितां येईल. " प्रधान यांस पुण्यास जावयास निरोप दिल्हा. लढाई जाली. शके १६५२ साधारणनाम संवत्सरे. इहिदे सलासीन मया व अलफ.

त्रिंबकराव दाभाडे लढाईंत पडले त्या वर्षीं श्रावणमासीं ब्राह्मण तळेगांवीं जमा जाले. पंचमीपर्यंत त्यांस सिधा व लिंगार्चन सांगणें [ तें न सांगतां ] दक्षणा दाभाडे यांणीं बंद केली. ब्राह्मण षष्ठीचे दिवशीं सर्व पुण्यास येऊन बाजीराव यांस " तुम्हीं सेनापति मारले, आमचें ब्राह्मणांचें अन्न [ त्याचा ] उच्छेद जाला, हें अपेश तुम्हांवर आलें " बोलले. त्यावरून तात्काळ महाराजांस विनंति लिहिली जे, " ब्राह्मणांचा धर्म सेनापतींनीं रहित केला. सरकारचा धर्म कोणीही

७३. ' बाजेदार ' चिटणीस प्रत. वरील पाठ कोलापूर प्रतीचा.

चालवावा. सरकारची नेमणूक आमचे तालुक्यांत मजुरा येईल. " म्हणोन ब्राह्मणांस भोजन स्वयंपाक करवून करविलें. पर्वतीनजीक जागा करून षष्ठीस प्रारंभ करून पंचवीस हजार ब्राह्मणभोजन दोन दिवस व दक्षणा यथायोग्य [ देऊन ] महाराजांची आज्ञा सांडणीची डांक पाठवून येतील ब्राह्मण त्यांस भोजन व षष्ठीस दक्षणेस आरंभ करून सप्तमीस समाप्त करावेंसें केलें. आणि तो क्रम चालविला.

उमाबाई दाभाडी पुत्र वारले म्हणोन बहुत यागी[78] जाहली. यावरून महाराजांनीं चित्तीं आणिलें जे, " उभयतां सरदार आपले. कलह होऊन अयुक्त गोष्ट जाहली. यांचें समाधान करावें. " म्हणोन श्रीमहादेव येथें श्रीचे दर्शनास स्वारी जाऊन श्रीजेजुरीस गेले. तेथून तळेगांवीं जाऊन उमाबाईचें समाधान बहुत रीतीनें करावें तसें करून त्रिंबकराव यांस पुत्र येशवंतराव दाभाडे होते त्यांस व उमाबाईस समागमें घेऊन सातारियास बराबर आणिलें. आणि बाजीराव प्रधान यांसही बोलावणें पाठवून आणविलें. उभयतांचीं बोलणीं ऐकून घेऊन उभयतांनीं पुढें कसें चालणें त्याचे तह करून देऊन, याउपरि कोणीं किंतु न धरितां सरकार सेवा करावी, एक विचारें असावें, उभयतांनीं कोणते मुलकांत कोणता अंमल कसा वहिवाटावा [ तें कळवून ] माळवा व गुजराथीची हद्द करून देऊन निमे स्वराज्याचा ऐवज हुजूर सरकारांत[79] यावा, निमेंत फौजेचा खर्च करून हिशेब समजवावा, त्यांत जातीचे खर्चाची नेमणूक करून पेषकशी[80] होईल ते हुजूर यावी, ऐसे तह उभयतांसही करून दिल्हे. येशवंतराव सेनापति यांस पदाचीं वस्त्रें बहुमान यथापद्धति देऊन गौरव करून निरोप दिल्हा. येशवंतराव व्यसनी जाले. बेहोषें[81] राहूं लागले. यामुळें पिलाजी गायकवाड यांणीं गुजराथ प्रांतींची स्वारी व काठेवाड वगैरे अंमल करीत जावे, उमाबाई खबरदार आहेत त्यांचे विचारें त्यांचे आज्ञेंत वागून कारभार चालवावा ऐसें करून दिल्हें."[82]

---

७५. प्रथम दक्षणेचा समारंभ नदीच्या काठीं खचुत्रखान्यांत होत असे, असें अन्यत्र लिहिलेलें आढळतें.

७६. ह्या वरील लढाईचा व दक्षणेच्या आरंभाचा शक ( १६५२ ) बरोबर आहे, परंतु ही गोष्ट बुंदेलखंडाचा तंटा मोडून घेण्याचे (१७३१ इसवी सन) पूर्वी झाली. वरील लिहिल्याप्रमाणें मागाहून घडली नाहीं.

७७. मागें पृष्ठ ४४ टीप ५५ पहा.

७८. यागी=संतप्त, दुःखी.

७९. तो पेशव्यांचे मार्फत यावा. ग्रांट डफ.

८०. पेषकशी=नजराणा.

८१. बेहोष=धुंद, अमलांत मग्न.

८२. बाजीराव व दाभाडे यांजमध्यें विरोध वाढण्यास कारण असें झालें कीं, सन इसवी १७२७/२८ सालीं निजाम उल्मुल्क यांणीं मराठ्यांमध्यें फूट करून त्यांच्या वाढत्या ऐश्वर्यास अडथळा आणून आपलें माहात्म्य वाढवावें ह्या हेतूनें जाधवरावाच्या मार्फत संभाजीचें राजकारण हातीं धरिलें. पंतप्रतिनिधि त्यास बहुतेक अनुकूल होतेच. दाभाड्याशींही त्यांणीं संधान बांधिलें. अशा वेळीं बाजीरावाच्या युक्तीनें व हिंमतीनें त्याचे सर्व बेत त्याच्याच गळ्यांत आले.

( पुढें चालू. )

आनंदराव महादेव खासनीस पोतनीस यांजपासोन कांहीं अमर्याद अपराध जाला. याजवरून त्यांस शिक्षा करावी, ऐसें महाराजांचे अंतःकरणीं आलें. हें त्यांस कळलें. यावरून ते व त्यांचे बंधु बाजीराव महादेव उभयतां निघोन फिरंगणांत गेले. दरखावर कारकून होते व दुसरे नेमून काम चालविलें. त्यांचे सापत्न बंधु धाकटे येशवंतराव महादेव भोरपेस होते. त्यांस घेऊन त्यांची मातुश्री आली. यावरून ते व हे एकत्र नाहींत ऐशी खातरजमा करून घेऊन, कांहीं दिवस दरमहा हलका करून देऊन, तशीच सेवा घेतली. त्यांणीं पाय उतारा स्वारींत राहून बहुत निष्ठेनें श्रम साहस फार केले. शहाणे कर्ते पाहून स्वारीचें [८३] पोतें व घोडा बसावयास देऊन, दरमहा वाढवून कृपा केली. इनामगांव उरवडे वगैरे जप्त केले होते ते यांचे नांवें सनदा करून देऊन मोकळे करून दिल्हे. रायगड सोडवणें, हे महाडचे देशपांड्ये, त्यीं[८४] राजकारणांत वागूं लागले. कांहीं दिवशीं पोतनिशी खासनिशी दोन्ही दरख[८५] यांचे नांवें करार करून देऊन बहुमान वस्त्रें देऊन कारखाने स्वाधीन केले. अठराही कारखाने यांची देखरेख खासगीकडील त्यांचे तर्फेचे कारकून ठेवून चालविली.

निजाम उन्मुलुख यांणीं मनांत विचार केला जे, " महाराज यांचा दिवसेंदिवस उत्कर्ष जाला. माणसें पदरीं मोठीं कर्तीं प्रतापी जालीं. फौज नामी बाळगतात. औरंगाबाद भागानगरपर्यंत फौज सरदार अंमल उगवण्यास हिंडतात त्यांत कटकटी पडतात. औरंगाबादेंत आपण केवळ लगत राहणें ठीक नाहीं. तहानीं चालावें हेंच युक्त आहे. भागानगरीं राहण्याचा विचार करावा. " म्हणून श्रीपतराव यांजकडे वकील पाठविले. आणि " भागानगर लगत दहावीस महाल येथील चौथ सरदेशमुखी वगैरे स्वराज्याचे अंमल आहेत

---

( मा. पृ. व. पु. चा. )

नबाबाशीं लढाई देण्याचें पतकरून बाजीरावानें त्याचा मुलूख उजाड करून बऱ्हाणपूर जाळण्याची अफवा उठविली. तिकडे निजामाच्या फौजा गेल्यावर आपण सपाट्यानें गुजराथेंत जाऊन अमदाबादचा सुभा सरबुलंद यास निजामानें तुमच्यावर मला पाठविलें अशी भुमका उठविली. व चौथ व सरदेशमुखी देण्यास कबूल असाल तर तुमच मुलखास इतर लोकांचा उपद्रव न लागण्याची जिम्मा मजकडे आहे असें सांगितलें. सरबुलंद यानें दिल्लीहून मदत येत नाहीं हें पाहून बाजीरावाचें म्हणणें कबूल करून सनदा करून दिल्या. पुढें बाजीराव यांणीं परत येऊन निजामास हैराण करून आपणांस पाहिजे तसा तह करून घेतला. गुजराथेंत जाऊन ह्या वेळीं बाजीरावानें अशा प्रकारें कारभार केला तो त्रिंबकराव दाभाडे यास बिलकूल खपला नाहीं. निजामाचे मनांतही मराठ्यांत दुई करण्याचा नाद अजून होताच. तेव्हां पुढें त्यानें त्रिंबकराव यास चिथावून मी तुमचा पाठपुरावा दक्षिणेंत करतों म्हणून सांगितलें. अशा कारणानें बाजीराव यांस निजाम व दाभाडे हे एकत्र होण्यापूर्वी दाभाड्यास गुजराथेंत गांठावें लागलें.

८३. पोतें=खजीना.

८४. 'त्याही राजकारणांत' कोलापूर प्रत.

८५. दरख=काम, अधिकार.

त्यांचा आकार पाहून गंगातीर, बालाघाट वगैरे तिकडील दरोबस्त अमलाखेरीज जागिरीचे महाल अंमल आहेत त्या आकारा बरहुकूम दरोबस्त अंमल मोबादला घ्यावा म्हणजे कटकटी पडणार नाहींत. बाकी तह ठरेल तसे दोहींकडील अंमल तहांनीं दुतर्फा सुरळीत चालावें." हें बोलणें महाराजांस विदित करून वकिलांच्या भेटी करून बोलणें चालविलें. यावरून महाराजांनीं सर्व मुत्सद्दी प्रधान सुद्धां मेळवून विचार विचारिला. तेव्हां बाजीराव प्रधान आपले मतें बोलले जे, "नबाब याशीं हरप्रकारें कटकट वाढवून त्याजवर स्वारी व लढाई देऊन त्याजपासोन जागिरीचा अंमल महाल सुटतील तितके सोडवावयाचे. आणि हा असा तह ते कटकट पडूं नये [ म्हणून ] मोबदला करावे, भागानगरीं जाऊन रहावें [ हें ] मनांत आणून बोलतात. हा तह करण्यांत विशेष दिसत नाहीं. आम्हांस आज्ञा जाली तरि हरप्रकारें त्यांची आगळीक जाली ऐसें करून मोबदला महाल बालाघाट, गंगातीरचे दरोबस्त करून देणार ते मोबदला अंमल भागानगराकडील न देतां सरकारांत सोडवून देतों." ते समयीं महाराजांनीं आज्ञा केली जे, "प्रतिनिधि राजकारण बोलतात हें एक वेळ सिद्ध करून महाल मोबदला येतात ते घ्यावे. भागानगर प्रांतीं दूर राहतात हा एक पक्ष चांगलाच आहे. तें जालियावरि तुम्ही बोलतां ही मसलत पुढें करणेंच आहे. ते करावयासि येईल," बोलले. यावरून, "सरकारची आज्ञा होते त्याअर्थीं आम्हांस राजकारणाचे बोलण्यांत गोवूं नये. आज्ञा जाण्याची द्यावी. [ आणि ] नंतर सरकारची मर्जी तसें करावें," बोलले. यावरून निरोप दिला. ते पुण्यास निघोन गेले. नंतर महाराजांनीं दादोराव भीमसेन भागानगर प्रांतींचे स्वराज्याचे अंमल उगवणें या कामावर व वकिलीवर होते, त्यांस आणवून आकार व मोबदला महाल कोणते घ्यावे हें पाहून, मोबदला महाल घेऊन तहनामा ठरविला, आणि प्रतिनिधीचें मनोगत सिद्धीस नेलें. शके १६५० तिसा अशरीन मया व अलफ.

[ तिकडे ] संभाजी राजे यांजकडे मालवण, रांगणा, पन्हाळा होते. तों ते बंधुच आहेत, त्यांचाही इतमाम चालला पाहिजे, म्हणून कांहीं मुलुख त्या लगत व स्थळें राहिलीं. खर्चाची नेमणूक व बेजमी करून दिल्हीच पाहिजे. बंधु अधिकारी आहेत म्हणून वरदळ सोसली. परंतु विचारें करून चालावें म्हणून बहुत प्रकारें सांगितलें. तसे चालतील तरि आणखी मुलुख नेमून द्यावा ऐसें महाराजांचें मनोगत, यावरून बहुत प्रकारें बोध करविला. परंतु त्यांचे अंतःकरणीं ती गोष्ट न येई. आणि मनांत

---

८६. प्रतिनिधि नेहमीं बाजीरावाच्या विरुद्ध असत व बाजीरावही त्यांची मसलत मोडून काढण्याचा नेहमीं प्रयत्न करी, या गोष्टीचें हें एक उदाहरण होय. ही गोष्ट अर्थात दाभाड्याशीं लढाई होण्याचे पूर्वी झाली होती.

आणिलें " शाहू महाराज यांनीं बंदोबस्त करून प्रांत सोडविले. कर्नाटक व हिंदुस्थान व माळवा सोडविले. स्थळें, किल्ले, मुलुख, फौज दौलत त्यांजकडे जमलें. यांत राज्यांत आपणांस निमे भाग यावा येविशीं बोललें असतां राज्यांत वांटणी देणें चाल नाहीं, तुम्हांस लागेल तो खर्च माफक नेमणूक घ्यावी, म्हणतात. त्यांचे पदरीं माणसेंही पराक्रमी जाहलीं. दैवही विचित्र आहे. यांस आपण मोठें राजकारण व पराक्रम करून दाखवावा तरि राज्यविभाग देतील. " ऐसें चित्तांत आणून मनसबा केला जे, " जाधवराव सेनापति महाराजांशीं विरुद्ध होऊन मोंगलाईंत गेले. आपणांकडे आले परंतु ते समयीं अंगिकार न केला. त्यापाशीं राजकारण करून, ते आपलेसे करून घेऊन, मसलत करून राज्याचा विभाग करून घ्यावा. " म्हणून राजकारणास विठ्ठल त्रिंबक खासनीस तिकडे राहिले होते, त्यांचे पुतणे नीळकंठ प्रभु महाडकर यांस प्रधानपद दिल्हें होतें, त्यांचे भाऊ केशवराव पाठवून जाधवराव यांचे हातें बोलणें लाविलें. तेव्हां नबाब यांस अवश्यक पडलें. औरंगजेब येऊन मुलुक सोडविला तो परतोन गेला. तह जाला. सनदा फर्मान करून आणिले त्याप्रमाणें चालवावें ते हिंदुस्थान प्रांत सोडवीत चालले. मसलत करणें. पादशाही [ मध्येंही ] बखेडा जाला. अनायासें घरफूट होऊन राजकारण आलें तें उभें करून मसलत करावी. ऐसें सिद्ध करून जाधवराव यांस ही मसलत करणें अवश्यक यावरून " संभाजी राजे यांणीं जी मराठी फौज व सरदार जमले तितके अनुकूळ करून घेऊन यावें. इकडून आम्ही फौज सामान पोख्त करून निघतों. आणि फौजेस खर्च पाहिजे तो तुमचा राज्याचा वांटा सिद्ध होईल तोंपर्यंत आम्ही दरमहा चालवितों. आणि तुम्हीं किल्ले, कोट, ठाणीं व सरदार मुत्सद्दी यांचीं राजकारणें व भेद होतील तितके करून निघून यावें. " ऐसें राजकारण सिद्ध करून आले. यावरून संभाजी राजे यांणीं कांहीं फौज जमाव केला. रामचंद्र अमात्य वगैरे घेऊन निघोन गेले. तिकडून नबाब पुढें येऊन भेटी होऊन हे ती फौज एकत्र जाले.

संभाजी राजे विपरीत बुद्धि करून हें राज्य देवब्राह्मणांचें, त्यांत श्रीसांब व श्रीभवानीची कृपा, यवन लोकांचा नाश करून राज्य वडिलांनीं स्थापिलें व आम्हीही सेवा करितों, यांत आपण यवनांचे आश्रयास जाऊन राज्यास अपाय करूं इच्छितों, हें शेवटास कसें जाईल, हा विचार करीत नाहींत. त्यापक्षीं आपणांस ही मसलत करणें प्राप्त जाली. म्हणोन वर्तमान समजलियावरून विचार करून सर्व प्रधान व फौज यांस तयारी करून येण्याविशीं पत्रें पाठवून तयारी

---

८७. या कलमाच्या आरंभापासून तों येथपर्यंत लिहिलेला मजकूर कोल्हापूर प्रतींत नाहीं.

८८. कोल्हापूर प्रत अमात्याचें नांव देत नाहीं. हा अमात्य रामचंद्रपंताचा पुत्र असावा.

करविली. नबाब यांणीं तोफखाना व जंगी[८९] सामान गारदी वगैरे मजबूद क-रून जाधवराव वगैरे सरदार मनसबदार व संभाजी राजे फौज सुद्धां कूच क-रून पुढें चालून आले. महाराजांनीं सर्व प्रधान बोलावून विचार केला जे, "सं-भाजी राजे यांणीं मनांत दुर्बुद्धि धरिली आहे. हें राज्य श्रीचे कृपेचें. थोरले महाराज यांजपासोन आजपर्यंत साध्य करण्यास कोण प्रयास लागले ! " म्ह-णोन त्यांस पत्रें लिहिलीं जे, " हें राज्य श्रीचें. यवन लोकांचे आश्रयास जाऊ-न त्यांचा आश्रय केला त्यास जय कसा येईल ! तुम्हांस राज्यलोभ बहुत होता तरि आम्हांस सांगोन पाठवावयाचें होतें. आम्हांपाशीं सेवक लोक दिगांत प्रताप करावे ऐसे आहेत. यांतील तुमचे बराबर एकास देऊन एकादें राज्य साधून दिल्हें असतें. किंवा पूर्वी महाराजांनीं साध्य केलें त्यांतून तुम्हीं साध्य करून आ-म्हांस पराक्रम करून दाखवावा होता. किंवा आम्हीं तें राज्य यवनांनीं घेतलें तें पुन्हा सोडवितों, [ तेव्हां ] तुम्हांसही याखेरीज यांतील सोडवून दिल्हें असतें. आम्हीं सोडविलें यांत मागावें, व राज्याचा विभाग करावा द्यावा म्हणावें हें कोठें नीत आहे ? पूर्वींही कोठें जालें नाहीं. हे कोण बुद्धि केली ! कैलासवासी राजा-राम साहेब यांणीं औरंगजेब मोठें बलाढ्य शत्रु दोन लक्ष फौज व दोन लक्ष पायदळासुद्धां येऊन संभाजी राजे यांचे अव्यवस्थेमुळें राज्यहरण केलें, सर्व फौज बुडाली, ऐसे समयांत कोणते प्रकारें चंदीकडे आम्हांस टाकून जाण्याचा समय प्राप्त जाला [ तेव्हां ] तसें करून चंदीस जाऊन पावले. तेथें फौज व सुभे म-मवून दौलत जमविली. आणि तेथून रात्रंदिवस शत्रूशीं लढाया देऊन फौज त्यांची बुडवून राज्याचा भाग अम्मल नेला. पुन्हा तेथें प्रसंग पडला असतां देशीं येऊन लढाया जातीनें देऊन त्यांचीं मोठीं स्थळें औरंगाबाद [ वगैरे ] जाऊन लुटलीं. ऐशी ख्यात केली. आम्ही नजरबंदींत होतों. त्यांचे पोटीं ते स-मयीं आपणच राज्याभिषेक करून राज्य करणें, सिंहासन करणें, असतें तरि त्यां-चे हातीं काय न होतें ? आमचे ठायीं कसें लक्ष ठेविलें, हें तुम्ही जाणत असो-न हा विचार केला. बरें, असो. जाली ती गोष्ट बरीच जाहली. याउपरि तरि यवनाचा आश्रय करावा हें विहित नव्हे ऐसें मनांत आणोन हरप्रकारें निभावें. तुम्हांस दौलत पाहिजे ती आम्ही नवीन सिद्ध करून देऊं अगर यांत खर्चास नेमणूक अधिक करून मागावी.[९०] राज्याचा वांटा म्हणणें हें पुराणांतरींही आइकें नाहीं. हे बुद्धि धरूं नये. " ऐशीं मत्रें व सांगोन पाठविलें कीं, " सेनापति

---

८९. जंगी—लढाऊ, युद्धसंबंधी हल्लीं ह्या शब्दाचा अर्थ अगदीं भिन्न झाला आहे.

९०. याजपुढें कोल्हापूर प्रतींत मजकूर निराळाच आहे तो " अगर ह्या दौलतींतच विभाग कसा करावा हें तुमचे आमचे विचारें बोलून घेऊं. तुम्ही व आम्ही राज्याचे मालक, घरगुती कामास यवनांचा आश्रय करूं नये. वडिलांनीं केलें त्याप्रमाणें तुम्हीं आम्हीं यव-नांचा पराभव एक विचारें करून राज्य साधून वडिलांचा नेम सिद्धीस न्यावा. "

सेवक लोक असोन, लढाई करून, हरामखोरी करून, महाराष्ट्र राज्य व धर्म सोडू-न यवनास शरण गेले. तेही मोठे कुळींचे रामदेवराव जाधवराव यांचा वंश. परंतु [ त्यांणीं ] धर्म सोडिला. त्यांची अनकूलता करून सेवक लोकांस व यव-नास शरण जाणें हें फार वाईट. " म्हणून बहुता रीतीनें सांगून पाठविलें अस-तां ते गोष्ट त्यांचे चित्तीं कांहींच आली नाहीं. आणि केले मनसुब्याचे अभिमा-नास पडून, निजाम उल्मुलुक यांणींही प्रतिनिधीचे विद्यमानें बोलणें ठरून तह झाला असतां लागलेच बिघाड करणें हा विचार न करितां, ते व हे मिळोन चालून पुढें आले.

त्यासमयीं महाराजांनीं सर्व सरदार प्रधान पंत व प्रतिनिधि व सेनापति व सरलष्कर व सेनासाहेब सुभा, फत्तेसिंग बावा भोसले व पवार विश्वासराव वगैरे दरखदार चिटणीस, पोतनीस जमा करून विचार केला जे, " निजाम उल्मु-लुक यांणीं तह केला [ असतां ] व पादशाही तह जाला असतां, आमचें गृह-च्छिद्र हातीं घेऊन [ त्यांणीं ] मसलत आरंभिली. जाधवराव निमकहराम हो-ऊन मसलतींत मिळोन राज्याचा विभाग पुराणांतरींही नाहीं तो करावा [ म्हण-तात. ] पाहिजे ते बेजमी करून घ्यावी म्हटेंलें असतां ऐकत नाहीं. अशी संभाजी राजे यांस दुर्बुद्धि निर्माण जाहली. याचा विचार कसा करावा ! जा-तीनें जाऊन नबाब यांशीं लढाई देण्याची ऐसा आमचा मनोदय जाला आहे. तुम्हीं सर्वांनीं फौजेची तयारी करून निघावें. " ऐशी आज्ञा केली. ते समयीं अष्ट प्रधान व सरदार यांणीं विनंति केली कीं, " आम्ही सारे सेवक लोक अ-सतां महाराजांनींच असे मसलतीस खांसा निघावें, ऐशी कांहीं मातबर मसलत हे नाहीं. खांसा पादशाहा दिल्लीहून चालून आला असतांही स्वामींस निघणें नलगे. ऐशी उमेद आम्ही सेवक ठेवितों. मग या मसलतीस विचार काय आहे ? पादशाहींतील एक सुभेदार नबाब चालून येतात त्यांत संभाजी राजे जाऊन मिळाले म्हणोन मोठी गोष्ट सिद्ध केली नाहीं. आपणांस निघणें तरि दिल्लीची पादशाही घेणें, आणि दुसरे खंडाचें राज्य घेणें, असें असल्यास निघावें ऐसें मनांत आणिलें तरि असो. या कार्यास एका सेवकास आज्ञा करावी. ज्यास आज्ञा होईल तो एकजण हें कार्य करून येईल. " ऐसें बोलले. हे सर्वांची उमेद व पराक्रम ऐकून महाराज बहुत संतोषी जाहले. आणि बाजीराव प्रधान व सेनापति व सरलष्कर, सेनासाहेबसुभा व हुजरांत फौजेचे सरदार यांस " सर्वांनीं तयारी करून निघावें " [ ऐशी ] आज्ञा जाहली. मोंगलाई लढाई म्हणोन तोफखाना तयार करवून आंगरे यांस आज्ञा करवून दारू गोळा त्यांणीं

११. वाचावा "पाहिजे तसें करून घ्यावें म्हटलें असतां." कोल्हापूर प्रतींत आहे.

१२. आंगरे यांस सांगण्याचें कारण असें कीं, त्यांस टोपीवाले यांच्या जाहजांत विलायती दारूगोळा पुष्कळ सांपडे.

पुरवावा ऐसें केलें. पायदळ बरावर दिल्हे. सर्वांनीं एकमतें चालून बाजीराव प्रधान यांचे मसलतीनें चालावें सांगितलें.

बाजीराव प्रधान व सरदार निघोन मोंगलांचे मोकाबल्यास पुढें गेले. आणि विचार केला जे, "तूर्तच लढाई देऊं नये. माणूस व दारूगोळा खराब करूं नये. भोंवतें हिंडून गोषमॅाल[13] देऊन त्यांचा मुलूख मारून धुंदी करावी. रसॅद[14] बंद करावी. घेरून धरून जेर करून जागां जागां घालॅवून[*] लढाई द्यावी." ऐसा विचार करून भोंवतालीं मुलूख मारून व जाळून फॅन्ना[15] केला. रसद, दाणा, गल्ला येणार त्या वाटा रोखून धरून मारूं लागले. मोंगलाचे लष्करांत महागाई पडली. मोठी मजल करणें राहिलें. मोठी मजल केली असतां भोंवत्या सडे फौजेच्या टोळ्या करून चोहोंकडून घालॅवूं लागले. बुणगे मारावे, कहीकबॅाड[16] मारावे, ऐसें करूं लागले. तेव्हां कोणीकडून कोणते समयीं येतील, घालविॅतील हा विचार पडला. याजमुळें दोन कोसांची मजल करूं लागले. नबाब यांणीं राजे व जाधवराव यांस बोलावून विचार केला जे, "मराठी फौज लढाई न देतां, मोड जाला तरि त्याचा हिसाब न धरितां, फिरोन पळोन जाऊन येऊन लढाई देतात. मुलूख मारून रसद बंद केली. घाबरें केलें. राजे तुम्ही व जाधवराव म्हराठी फौज, तुम्हीं त्यांच्यामागें लागावें, लढाई द्यावी, तें तुम्ही करीत नाहीं. तुम्हीं उभयतां त्यांप्रमाणें आपले फौजेच्या टोळ्या करून त्यांचे मुलकांत बैसावें, मुलुख मारावा, लढाई देऊन ठाणीं घ्यावीं, हें करीत नाहीं. तुमचे भरंवशियावर, तुम्हींही मराठे, त्यांजप्रमाणें धुंदी कराल, म्हणून मसलत केली. [त्यांशीं] बिघाड केला. त्यास याउपरि तरि याप्रमाणें करून त्यांस घाबरें करावें. लष्करास रसद आणून पावती करावी," बोलले. तेव्हां जाधवराव यांणीं उत्तर केलें जे, "आम्हांपाशीं लोक बहुतकरून मोंगल आहेत. याजमुळें धांवणी होत नाहीं." राजे यांणीं उत्तर केलें जे "आम्हांकडील फौज बाहेर रवाना करावी तरि जमात भारी नाहीं. आणि आम्हांस कांहीं एकांतीं बोलावयाचें आहे." म्हणून सर्व लोक आपले कारभारी सुद्धां लावून देऊन नबाबापाशीं बोलले जे, "आम्हांकडील दरमहाचा ऐवज देणें तो कारभारी यांजपाशीं देऊं नये. आम्हांपाशींच पाठवीत जावा." तें ऐकोन बरें म्हणोन सांगोन तबक आणवून निरोप दिल्हा. आणि नबाबांनीं विचार केला जे, "याउपरि पुढें चालून जाणें ठीक नाहीं. फौज गॅारद[17] होईल." म्हणोन कूच करून मागें

---

१३. गोषमाल=कान पिळणें, बाजूनें हल्ला करून निघून जाणें ?

१४. रसद=द्रव्याचा व धान्याचा पुरवठा.

* घालविणें=घाला घालणें.

१५. 'तजाल'? चिटणीस प्रत.

१६. कहीकबाड=दाणा वैरण पुरविणाऱ्या टोळ्या व त्यांणीं आणिलेलें सामान.

१७. गारद=नष्ट, नाइनाट.

सरले आणि मनांत आणिलें कीं, " प्रधान पदाचे अधिकारी व कारभारी ज्यांनीं इतकी मसलत उभी करून राजकारण केलें त्यांचा विश्वास नाहीं. मसलतीचें बोलणें एकीकडे राहिलें. दरमहाचा ऐवज खासगीस नेऊन लोकांस न देतां खजीन: करावयाची इच्छा धरिली. शिपाईगिरी व मसलत कजाखी[९९] करणें हें कांहींएक दौलतीचें चिन्हच नाहीं. राजाराम यांचे बेटे, त्यांसारखे असतील, ऐसे आमचे मनांत. ते हे ऐसे कोता अंदेशाचे आहेत. बरें मोठीं पदरीं माणसें मनसबदार व सरदार मोठे कजाखीचे तेही नाहींत. येते समयीं चार लोक नवीन जमाव करून तेही राज्य कसें करावें, त्यांजपासोन काम कसें घ्यावें, हें कांहींच नाहीं[१००]. यांचे भरंवशियावर इतकी मोठी मसलत आम्हीं करून शाहू राजे यांशीं बिघाड केला, ही गोष्ट आम्ही बहुत वाईट केली. " म्हणोन नबाबाची हिंमत निघोन गेली. आणि मसलत तरि केली याचा परिणाम दिसत नाहीं म्हणून बहुत विचारांत पडले. या संधींत जाधवरावास बुद्धि आठवली जे नाटकशाळेचे पोटीं पुत्र जाला होता, त्याजवर बहुत प्रीति [ होती. ] त्यास राजे यांनीं ताटांत घेऊन गोतपत करून मराठे यांच्या सोइरिका कराव्या ऐसा मनांत निश्चय करून राजाशीं बोलणें लाविलें. तेव्हां त्यांनीं " ही गोष्ट साफ घडावयाची नाहीं " म्हणोन सांगितलें. तेव्हां " आम्हीं राजकारण करून नबाबाचा स्नेह करून देऊन दौलतीचा वांटा देववावा ऐसें केलें असतां तुम्हीं आग्रह करितां हें ठीक नाहीं, " म्हणोन आग्रहास पडले. यांसही " हे गोष्ट करावयाची नाहीं " म्हणून आग्रहास येणें प्राप्त होऊन विरुद्ध वाढलें. बाजीराव व फौज यांनीं लष्करांतोन बाहेर माणूस पडलें किंवा कही निघालीं म्हणजे मारावीं, दाणापाणी [ यांची ] बंदी बहुत करावी, आघाडी पिछाडी मारावी, हत्ती घोडे शिपाई लोक पाडाव करून न्यावे, ऐसें करूं लागले. याजमुळें एक दिवस मोठी मजल करावी ऐसा विचार करून मागें पुढें फौज तोफा वगैरे तयारी करून [ नबाब ] निघाले. तेव्हां यांणीं फौजेच्या टोळ्या करून घेऊन चालले. आणि आघाडी मारिली. कधीं कधीं लोक शिरोन बुणगे हत्ती घोडे पाडाव करून नेऊं लागले. पाणी नाहीं ऐशी जागा पाहून चहूंकडून बहुत लगट करून पिछाडी मारिली. नबाब [ यांणीं ] पुढें चालणें अवघड पाहून तोफा चहूंकडे ठेवून मारगिरी केली असतां लांबून उभे राहून दौड करूं लागले. पुढें चालणें घडेना. तेथें मुक्काम करून रहावें तरि पाणी नाहीं. ऐसे बहुत घाबरे जाहले आणि विचार केला जे, " ये समयीं आपली कुलशाई[१] बुडवून गारद[२] करितात. " याजवरून

---

९८. हे संभाजींचे पेशवे निळकंठ प्रभू महाडकर.

९९. कजाखी=भांडाभांडी, आडून पडून लढाई.

१००. हा संभाजीचे उणेपणाचा मजकुर कोल्हापूर व इंदूर प्रतींत नाहींत.

१. शाही=अंमल, राज्य.

२. गारद=नष्ट.

वकील पाठविले आणि सांगून पाठविलें जे, " जाली गोष्ट बरी जाली. लढाई तहकूब करावी. तुम्ही आपली फौज एक बाजूस करून आम्हांस पाणियाचे सुमारें जाऊन मुक्काम करूं द्यावा. तुम्हींही भोंवतीं आपली फौज ठेवून मुक्काम करावा. आणि तहाचें बोलणें करावें." याजवरून प्रधान व सरदार यांणीं एक विचार करून सांगून पाठविलें जे, " तहाचें बोलणें असलियास तुम्हांकडील एक दोन मातबर माणूस कारभारी आम्हांपाशीं पाठवून द्यावे, म्हणजे तुम्हांसही पाणी वाट देऊन मुक्काम करवितों व आम्ही करितों. " यांजवरून त्यांणीं मातबर असाम्या पाठविल्या. नंतर मुक्कामास पाणी जागा नेमून दिली. नबाब जाऊन उतरले त्यांस घेरून मागें पुढें आपली फौज उतरविली. आणि प्रथम मुद्दा घातला जे, " संभाजी राजे महाराजांचे बंधु आपणापाशीं आले, ते धनीच आहेत, त्यांस आपण [ आम्हांकडे ] रवाना करावें. त्यांणीं आपले फौजेंत येऊन राहवें. नंतर सर्व बोलणीं चालतील. त्यांचे मतलब असतील ते लेहून पाठवावे. त्यांचेविशीं विनंति आम्ही महाराजांपाशीं करून वाजवी असतील ते करून देऊं. दुसरें स्वराज्याचा अंमल तुमचे तालुकदार सुरळीत कोठें कोठें देत नाहींत. तो राहिलेला आमचा फडशा करून देऊन पुढें सुरळीत चालावें. तिसरें, आम्ही मुलूक व ठाणीं आमची अंमल नीट चालण्याकरितां मागूं तीं दरोबस्त द्यावीं. कांहीं महाल द्यावे." ऐसें सांगोन पाठविलें. ते सर्व मतलब नबाबांनीं मान्य केले. आणि " संभाजी राजे मात्र तुमचे हातीं देऊन घालवावे हे गोष्ट मोठेपणाचे ईजतींत लायक दिसत नाहीं. हे दौलत व ते कांहीं दोन नाहींत. यास्तव आम्ही आपणाकडील कांहीं लोक बराबर देऊन त्यांचे सरंजामसुद्धां पनाळियास पोहोंचवून देतों. त्यांस वाटेस कांहीं एक उपद्रव न करितां तेथें गेलियावरि तुम्ही व ते घराऊ मजकूर पाहिजे तसा करावा. " असें सांगून पाठविलें. तें यांणीं मान्य केलें. आणि वरकड मतलब करार जाले त्याचा तहनामा ठरविला. राजे यांस रवाना करून दिल्हे. संभाजी राजे यांस त्या समयीं बहुत वाईट वाटून पश्चात्ताप जाला जे " आपण यवनाचें घरीं गेलों. जाधवराव यांचे बुद्धीस लागलों. त्यांणीं जातीस बट्टा लावण्याचें योजिलें. जाली गोष्ट दैवानरूप जाली. याउपरि कोणताही विचार महाराजांचे विरुद्धतेचा न करितां महाराजांची आज्ञा मान्य करून सख्य करून रहावें हाच उत्तम परिणाम आंहे. " ऐसा विचार करून निघोन गेले. नबाबांनीं प्रधान व सर्व सरदार यांस वस्त्रें जवाहीर मेजवानी पाठविली. महाराजांस पोषाख, जवाहीर, हत्ती, घोडे पाठविले ते घेऊन यांणींही नबाबास पोषाख

३. इजत=प्रतिष्ठा, अबरू.

४. हा पश्चात्तापाचा मजकूर कोल्हापूर व इंदूर प्रतींत नाहीं.

जवाहीर, हत्ती, घोडे पाठविले. आणि कूच करून जाण्यास मार्ग देऊन कूच करविला. याप्रमाणें यश संपादून महाराजांचे सरदार व फौज निघोन आले. महाराज सामोरे जाऊन बहुत सन्मान करून, सर्वांचा समाचार घेऊन, गौरव केला. वस्त्रें, जवाहीर, बक्षिसें ज्यांणीं कामें केलीं त्याप्रमाणें [ त्यांस ] दिलीं.

उदाजी चव्हाण अथणी प्रांतांत होते. ते शिरवळचे ठाणियांत राहून चव्हाण चौथाई म्हणोन पुंडपणा करीत असतां कोणी एके दिवशीं महाराज अंबेरीचे कुरणांत शिकारीस गेले होते, त्या सुमारें उदाजी चव्हाण स्वारीस आले आहेत असें कळलें. यावरून महाराजांपाशींही फौज हजार पांचशें होती, त्यांणीं सांगितलें जे, "आम्हांस आज्ञा करावी म्हणजे जाऊन धरून आणितों" तेव्हां महाराज बोलले जे, "ते कांहीं आम्हांवर मसलतीस आले नाहींत. आम्हीही त्यांजवर मसलतीस निघालों नाहीं. ते आपली खंडणी घ्यावयासि आले ते जवळ अकस्मात् पावले. येथें धरून पुरुषार्थ कोणता जाला ?" [ असें ] म्हणून कारकून पाठविला जे, "तुम्हीं कांहीं एक संशय न धरितां शिकारीस यावें. तुम्हीं आम्हीं मिळोन शिकार खेळून नंतर पुन्हा मागती जावें. नंतर पाहिजे तशी मसलत करावी." म्हणून हातांतील मुद्रा आंगठी व कारकून हुजरे पाठविले. ते शें दोनशें स्वारांनिशीं होते ते सडे दहा वीस स्वारांनिशीं आले. शिकार जाली. नंतर त्यांस वस्त्रें पोशाख देऊन विडे देऊन निरोप दिला.

कोणे एके दिवशीं मोठे पहाटेस निघोन महाराज शिकारीस गेले. जातीनें हातींची काठी घेऊन पालखी व लोक लांब ठेवून झाडांत पाखरें धरावयासि लागले तों दोन जामग्या झाडाचे आड दृष्टीस पडल्या. तेव्हां पुढें होऊन तुम्ही कोण आहां [ असें बोलून ] हांक मारिली. तों ते गळित जाहले. आणि पुढें होऊन मुजरे केले. आणि सांगितलें जे, "आम्ही मारेकरी आहों." तें "कां मारिलें नाहीं ?" विचारिलें. ते बोलले "महाराजांस पाहतांच आमचे हातपाय गळाले, हिंमत जाली नाहीं." "कोणीकडील आहां ?" बोलले, ते "पलीकडील पन्हाळ्याकडील आहों" बोलले. ते समयीं महाराज बोलले जे, "जालें तें बरें जाहलें. तुम्ही सांपडलां तरि कारभारी व श्रीपतराव मारून टाकतील. बंदुका ठेवा आणि निघोन जा." असें सांगितलें. तेव्हां बंदुका ठेवून निघोन गेले. यानंतर लोकांस हांक मारून बंदुका स्वारींत घेऊन आले. वर्तमान सर्वांस

---

५. हा चव्हाण मोठा पुंड होता. तो आपणास कोल्हापूरकरांचा आश्रित म्हणवीत असे, तथापि त्यांसही तो जुमानीत नसे. तो भोंवतालच्या प्रांतांतून 'चव्हाण चौथाई' नांवाचा आपणच एक निराळा कर घेई.

६. पुढें 'अजातशत्रु' ( धर्मराज ) असें शाहूस म्हटलें आहे तें किती योग्य आहे !

७. जामग्या. जामगी=पेटलेला तोडा ( बंदुकीचा ).

८. 'पन्हाळ्याकडील' हे शब्द कोल्हापूर व इंदूर प्रतींत नाहींत.

सांगितलें. याप्रमाणें अजातशत्रु महाराज !! शत्रूसही घाताची इच्छा होऊं नये ऐसें जालें.

[ पुढें ] उदाजी चव्हाण पुंडपणा करितात म्हणोन त्यांजवर श्रीपतराव प्रतिनिधि फौज सामान देऊन रवाना केले. ते चालून गेले ते समयीं संभाजी राजे आणखी वीरश्रीस येऊन सामान घेऊन त्यांचे कुमकेस आले. तेव्हां लढाई जाली. चव्हाण व राजे यांचा मोड जाला. सडे उभयतां पळून गेले. कबिले बुणगे लुटले गेले. डेरे होते त्यांत आंईसाहेब व राजसबाई साहेब व संभाजी महाराजांचे कबिले सर्व सांपडले. फौज बुणगे लुटले. सरकारी लवाजिम्याचा बंदोबस्त प्रतिनिधींनीं राखिला. आणि " आपण धणीच आहां, महाराजांचे भेटीस चलावें " म्हणून यश संपादून घेऊन सातारां आले. महाराजांस कळतांच पुढें सामोरें जाऊन, " या योगें तरि उभयतां मातोश्री यांच्या सर्वांच्या भेटी जाहल्या, " म्हणून बहुत सत्कार केला. वस्त्रें अळंकार देऊन मेजवानी केली. " जावयाची मर्जी असेल तरि निघोन जावें " सांगितलें. ते समयीं ताराबाई साहेब हीं " कोठेंही कैदेंत राहणें त्यास ते व तुम्हीं मजला सारखेच आहां. तुम्हापाशींच राहतों, " बोललीं. त्यांस लवाजिमा खर्च नेमून करून देऊन सातारा किल्ल्यावरील वाडा नीट करून तेथें ठेविली. आपले तर्फेनें कारभारी यादव गोपाळ करून दिल्हे. आपणाकडील विश्वासू ठेविले. वरकड सर्वांस बहुमान कारकून व चाकरीचे लोक सुद्धां सनगें व खर्चास देऊन कांहीं पागा व फौज बराबर देऊन संभाजी राजे यांजकडे पावतीं करून दिलीं. शके १६५१.

[ इकडे ] कान्होजी आंगरे वारले. त्यांस पुत्र सखोजी आंगरे व संभाजी आंगरे दोन खांसे बायकांचे होते व दुसऱ्या बायका नाटकशाळा यांस एकीस तुळाजी आंगरे व एकीस येसाजी आंगरे व ऐकीस मानाजी आंगरे असे तीन होते. एकूण पांच. त्यांत सखोजी आंगरे यास सरखेल पदाचीं वस्त्रें व सुभ्याच्या सनदा पाठविल्या. शके १६५०. ते थोडकेच दिवसांत वारले. शके १६५१. नंतर संभाजी आंगरे यांस वस्त्रें पदाचीं [ दिलीं ] व सुभा सांगितला. ते विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, येथें राहून कुलाब्याचा सुभा येसाजी आंगरे यांस सांगोन पाठविला. व नामजाद मानाजी आंगरे सरदार पाठविले. तेथें उभयतांचें बनेना. तेव्हां मानाजी आंगरे रेवदंडा किल्ला फिरंगी याजकडे होता तेथें निघोन गेले.

हिंगणी बेरडीकर परसोजी भोंसले हे महाराजांचे घराण्यांतील,

---

९. अजातशत्रु–हें विशेषण धर्मराज यांस मात्र लाविलेलें आढळतें.

१०. आईसाहेब=ताराबाई.

११. ' व एकीस ' हे शब्द चिटणीस प्रतींत माहीत त्यावरून येसाजी व मानाजी हे एकाच आईचे असें होईल.

१२. या म्हणण्यास ग्रांटडफ यांचें मत अनुकूल नाहीं.

सेनासाहेबसुभा यांस होता, ते वारले. त्यांचे पुत्र कान्होजी भोंसले यांस सेनासाहेब सुभा पदाचीं वस्त्रें दिल्हीं. परसोजी भोंसले यांस आणखी दोन बंधु होते. दुसरे बापूजी भोंसले. तिसरे साबाजी भोंसले यांस संतान नाहीं. त्यांस दत्त पुत्र बापूजी भोंसले यांचे पुत्र संताजी भोंसले दिल्हे होते. ते दिल्लीस बाळाजी विश्वनाथ यांजबराबर गेले. तेथें लँढाईत पडले. सँबाजी भोंसले याची स्त्री रामाऊबाई सातारां होती. बापूजी भोंसले यांस वडील स्त्रीस पुत्र परंतु धाकटे जाले राणोजी भोंसले व संताजी भोंसले. धाकटीस बिंबाजी भोंसले परंतु वडील आधीं जाले. त्यांस रघोजी भोंसले. कान्होजी भोंसले यांणीं आज्ञा उल्लंघन केली म्हणून यांस पाठवून आणवून कैदेंत ठेविलें. आणि रघोजी भोंसले कर्ते, शहाणे, कारभार करीत होते त्यांस सेनासाहेब सुभा पँद दिलें.

खंडो बल्लाळ चिटणीस शरीरीं पीडा होऊन वारले. शके १६४८ पराभवनामसंवत्सरे आश्विन शुद्ध ५ पंचमी. त्यांस पुत्र चार. वडील जीवाजी खंडेराव, दुसरे बापूजी खंडेराव, तिसरे गोविंद खंडेराव व चवथे सापत्न, धाकटे स्त्रीचे बहिरव खंडेराव ऐसे होते. जीवाजी खंडेराव यांस चिटणिशीचीं वस्त्रें द्यावीं. ते समयीं मंत्र्यांचे विद्यमानें नजर लाख पन्नास हजार रुपये घेऊन चिटणिशी सांगावी [ अशीं ] बोलणीं एक दोन बोलले. महाराजांनीं बरें जामदारखाना निशा येऊं द्या [ असें म्हणून ] सांगून आणविलीं. आणि कचेरीस प्रतिनिधि व सर्व बोलावून " पूर्वी थोरले महाराजांनीं वडिलांनीं शफत पत्रें दिलीं. स्वामीचे वंशांनीं घालमेल करूं नये. याची तोड कशी करावी ? विचारितां सर्व उगेच राहिले. प्रतिनिधि " यास तोड कोण काढणार आहे ? " बोलले. थोरले जीवाजी खंडेराव यास आणून वस्त्रें बहुमान कलमदान याप्रमाणें देऊन चिटणिशी चालविली.

संभाजी राजे मोंगलाईंत गेले. तिकडे जाऊन कांहीं एक मनाजोगें जालें नाहीं. जाधवराव यांनीं नेऊन नाटकशाळेचे पुत्रांस ताटांत घेण्याचा आग्रह करून वांकडे वागूं लागले. नबाबाची मसलत फसली. त्यांनीं हातीं न देतां

१३. ग्रांटडफ म्हणतात हा परसोजीचा दासीपुत्र होता.

१४. ' सोमाजी ' असें येथेंच चिटणीस प्रतींत आहे तें नजर चुकीनें पडलें असावें.

१५. परसोजी बापूजी व साबाजी हे बंधु. परसोजीचा कान्होजी. बापूजीस धाकटे स्त्रीचा बिंबाजी आधीं झाला व थोरले स्त्रीचे राणोजी व संताजी पाठीमागून झाले. बिंबाजीचा रघोजी. कान्होजीस प्रथमतः पुत्र नसल्यामुळें त्याचें प्रेम त्याच्या चुलत भावाचा मुलगा जो रघोजी याजवर बसलें होतें. पुढें कान्होजीस मुलगा झाल्यावर रघोजी साताऱ्यास आला. तेथें तो शाहूबरोबर शिकारीस जात असे व पारधीच्या वेळीं त्यानें एकदां एका वाघास मारून शाहूचा प्राणही वांचविला होता. नागपूरकर भोंसल्यांचे कागदपत्र लेख १ पहा.

१६. कोल्हापूर प्रतींत वरील मिति दिली नाहीं. शक मात्र आहे.

पन्हाळ्यास पावते केले. ऐसे सर्व प्रकारें मसलत सिद्धीस न गेली. पुढें आलि-यावरि चव्हाण यांचे कुमकेस जाणे पडले. तेथेंही मोड होऊन कुटुंब सर्व ति-कडे नेलें तें लावून दिल्हें. शाहू महाराज यांचें दैव विचित्र व पराक्रमी सेवक लोक व फौज पराक्रमी जें इच्छिलें तें कार्य सिद्धीस नेतात. वडील तक्ताचे खावंद अधिकारीच आहेत. आपण द्वेषभाव धरिलियास सिद्धीस जात नाहीं. यास्तव [ तो ] सोडून सख्य करावें हाच उत्तम पक्ष आहे. ऐसे बहुत प्रकारें खिन्नता चित्तांत आली. व मातोश्री जीजाबाईसाहेब यांणींही बहुत प्रकारें सांगि-तलें जे, " महाराजांकडे वकील पाठवून तह सख्य करावें." यावरून बाबाजी प्रभु पारसनीस, चिटको प्रभु चिटणीस यांजकडील तेथें होते. उभयतां वकि-लीस महाराजांकडे पाठविले जे, " आम्हांस खर्चास मुलुख नेमून पन्हाळा वगैरे प्रांत व त्यांतील स्थळें किल्ले निर्वेध चालवावे. स्वारी शिकारी करण्यास कांहीं खंडणीचा प्रांत नेमून द्यावा. याउपरि आम्हांस विरुद्ध कांहींएक न क-रितां महाराज आज्ञा करतील त्याप्रमाणें चालण्याचें." याप्रमाणें ठरावांत पक्केप-णीं आणिलें. तेव्हां महाराजांनीं, " तुम्ही बंधुच आहां. तुमची आमची भेट व्हावी. नंतर सर्व मजकूर तुमचे मनोदय तसे करून दिल्हे जातील " सांगितलें. परंतु सफाई भेटी जाहलिया वांचून येणेंही न होय. यावरून " आम्ही त्या प्रां-तालगत येतों तुम्हीं तिकडून यावें. तुम्हांस बोलण्यास व विश्वासास आणावयास पुढें मातबर सरदार रवाना करितों " सांगितलें. त्यांनींही मान्य केलें. महाराज स्वारी तयार होऊन उंब्रजेनजीक जाऊन राहिले. आणि मातबर सरदार प्रति-निधि, नारो राम मंत्री, अंबाजीपंत पुरंदरे प्रधान यांचे मुतालिक व कृष्णा-जी दाभाडे व निंबाळकर व पांढरे ऐसे सरदार पाठविले. ते पन्हाळ्यास फौजसुद्धां गेले. ते जाऊन महाराजांस भेटले. त्यांस महाराज सामोरे येऊन सर्वांनीं नजरा केल्या. त्यांस यथापद्धती चादरा घातल्या. सरदार किल्ल्याखालीं येऊन आपले डेऱ्यास उतरले. संभाजी राजेही खालीं येऊन उतरले. तेथून पुढें वा-टारावर आले. तेथून श्रीपतराव सरदार पुढें उंब्रजेस येऊन सफाईचीं बोलणीं समजाविलीं. आणि कराडानजीक जखणवाडीचे मैदानांत भेटीचा नक्षा ठर-विला. महाराज [यांचा] कूच होऊन कराडावर श्रीकृष्णेतीरीं डेरे होऊन मुक्काम करविला. आणि तेही तिकडून कूच करून दक्षिण तीरीं डेरे मुक्काम करवून वाडीचे मैदानांत दोहींकडील स्वाऱ्या सोन्याच्या अंबारींत बसोन सर्व मातबर सरदार सर-काराकडून यांच्या अंबाऱ्या मागें, मध्यें दुतर्फा कोरबंदीस[17] लोक या लष्करचे त्या लष्करचे एकसाहा उभे राहिले. त्यांचे मुजरे घेत मध्यें बिछायत केली होती तेथ-पर्यंत जवळ जाऊन संभाजीराजे अंबारींतून उतरोन घोड्यावर स्वार झाले.

---

१७. कोरबंदी=( सलामी वगैरे करितां ) फरा, रांग.

महाराजही उतरोन घोड्यावर स्वार होऊन बिछायतीपाशीं उतरोन भेटी झाल्या. संभाजीराजे याणीं पायांवर मस्तक ठेविला. महाराजांनीं उठवोन आलिंगन दिल्हे. उभयतांही बहुत दिवसांच्या भेटी श्रीकृष्णा-सांनिध्यें होऊन बहुत आनंद जाहला. ते समयीं सुवर्णपुष्पें व रौप्यपुष्पें यांची वृष्टि केली. शहाजानें व नानाप्रकारचीं वाद्यें वाजलीं व तोफांची सरबत्ती करविली. आणि महाराज यांणीं संभाजीराजे यांस हातीं धरून आपले अंबारीपाशीं येऊन उभयतां एके अंबारींत बसोन स्वारी दक्षिणतीरीं डेरे दिल्हे होते तेथें घेऊन आले. बहुत प्रकारें कुशल प्रश्न व बोलणीं [ झालीं कीं ] आज मोठे लाभाचा सुदिन जाला. ऐसें होऊन संभाजीराजे यांस बसले होते तो हत्ती व दोन घोडे नामी[18] रंगाचे दिल्हे. सुवर्णाचे सामान व पोषाक जवाहीर ऐसें दिल्हे. आणि उत्तरतीरीं त्यांचे डेरे होते, तेथें जाण्यास निरोप दिल्हा. शके १६५२ साधारणनामसंवत्सरीं सन इहिदे सल्लासीन मया व अलफ. फाल्गुन शुद्ध ३ तृतीया, [ ते दिवशीं ] भेटी जाल्या. तेथून उंब्रजेचे मुक्कामीं आले. तेथें मेजवानी भोजनें जालीं. आणखी दोन हत्तीं व दोन घोडे वस्त्रें जवाहीर संभाजी राजे यांस दिल्हें. नंतर सातारेस जाऊन तहाचें बोलणें व्हावें व शिमगा तेथें व्हावा, दोन महिने तेथें राहावें अशीं बोलणीं होऊन सातान्यास आले. आणि सातारां येऊन जीजाबाई साहेब परत गेलीं. दोहींकडील मेजवान्या वगैरे बहुतच सफाई जाली. या नंतर तहनामा ठरावांत सनमजकूर शके १६५३ चैत्र वद्य २ द्वितीया छ १६ सव्वालीं ठरला. वारणेचें दक्षिण.तीर पन्हाळा प्रांत वारणा कृष्णा संगमापासोन दक्षणतीर तुंगभद्रेपर्यंत त्यांतील किल्ले ठाणीं आणि स्थळें मालवणपर्यंत व स्वारी अम्मल रामेश्वरपर्यंत निम्मे संस्थानी यांची खंडणी तुम्ही साध्य कराल ती घ्यावी, ऐसें करून दिल्हें. वडगांव कोट पाडावा, मिरज, तासगांव, अंयणी सोडावी. गांव प्रांत आलीकडील सोडावे. आम्ही वारणे पलीकडील प्रांत सोडून देतों. रत्नागिरी व जयदुर्ग प्रांत सोडावा. इकडील लोक तिकडे चाकरीस ठेवूं नये व अपराधी लोकांस परस्परें आश्रय देऊं नये. चाकरीस ठेवूं नये.[20] राज्य-साधनाचें साह्य करीत असावें. कर्नाटक प्रांतीं खंडण्या घेत जाव्या. [ ऐसें ] ठरावून दिल्हें. त्यांजकडून कांहीं जालें नाहीं. याजमुळें पुढें महाराजांच्या फौजा जाऊन खंडण्या व अम्मल घेत आले. संभाजी राजे [ यांस ] तह ठरोन सर्व सरदार व अष्टप्रधान यांणीं मेजवान्या केल्या. त्यांनी ही महाराजांस, सर्वांसही, मेजवान्या केल्या. आणि निरोप घेऊन गेले.

---

१८. 'जामीरंगाचे' जामी, जांबी=जांबासारखा.

१९. हें वाक्य कोल्हापूर प्रतींत मात्र आहे.

२०. 'अपराधी' या शब्दापासून येथपर्यंत इतके शब्द चिटणीस प्रतींत नाहींत.

महाराज चार कोस घालवीत गेले. बराबर पोंचविण्यास फत्तेसिंग भोंसले दिल्हे. ते पन्हाळियास पोंचवून परत आले.

उदाजी चव्हाण चौथाई घेण्यास चुकेनात. घेऊं लागले. यावरून कांहीं सामान देऊन येशवंतराव महादेव पाठविले. तों त्यांणीं मोड केला. सांपडले. कांहीं द्रव्य घेऊन लावून दिल्हे. यावरून महाराजांचे मनांत उदाजी चव्हाण संभाजी राजे यांचेही कह्यांत वागत नाहींत, पूर्वापार पदरचे म्हणोन बरदाळ सोशीत आलों, परंतु चव्हाणचौथाई म्हणून अंमल पुंडावे करून लगत प्रांतीं घेतात, तो बंदोबस्त जाला पाहिजे. म्हणून पाहिजे तेव्हां बंदोबस्त करितां येईल [ असें ] मनीं आणिलें.

हबसी याजकडे जंजिरा हें स्थळ बेलाग[२१] राहिलें. पूर्वीं थोरले महाराज यांणीं प्रयत्न केला परंतु घडून आलें नाहीं. कोंकण प्रांत गेला तो सर्व सोडविला व तहांत आला, परंतु हें स्थळ व सुभा दिल्लीचा, केवळ लगत राहण्यास जागा, हे हस्तगत होत नाहीं. ते हरप्रकारें व्हावी [ हा हेतु ] बहुत मनामध्यें धरिला. आणि रायगड हें महाराजांनीं बहुत बिकट [ जागा ] पाहून तख्त व राज्याभिषेक तेथें केला. ते औरंगजेब यांणीं विखर प्रसंग केला, त्यास हबशी यास मसलत सांगितली,[२२] तेव्हां त्याचे हातीं लागली. यावरून येशवंतराव महादेव पोतनीस यांस सांगून राजकारण सांगितलें होतें तें सिद्ध केरविलें. हबशी जंजिऱ्याहून कोंकण प्रांत व मावळ येथें चोरटे लोक पाठवून स्वारी रात्रीस घालून खंडणी करून बहुत उपद्रव देतात. कोंकण व मावळ प्रांतीं चौथाई म्हणून अंमल नेतात. हे हरप्रकारें घ्यावे. ऐसें चित्तांत आणून सेखजी म्हणून मातबर सरदार हबशी याजकडील होता, त्याजला पन्नास हजार रुपये देऊन भेद करविला. त्या समयीं शिद्दी ईसुल[२३] याकुतखान तख्तनशीन होते ते वारले. त्यांचे थोरले लेक शिद्दी अबदुल जंजिऱ्यांत राहिले. आणि धाकटे शिद्दी अबदुल रहिमान हे मुरदा दफनोवयासि[२४] राजपुरींत बाहेर आले. ते समयीं आणखी धाकटे बेटे शिद्दी सबुदुल व शिद्दी अंबर आफखानी व शिद्दी रहाण व शिद्दी याकूत म्हणून चौघे होते. यांणीं एक विचार करून शिद्दी अबदुलखान वडील होते त्यांस मारलें. आणि चौघेजण मिळोन बळकावून जंजिरे याचे दरवाजे लावून राहिले. शिद्दी अबदुल रहिमान बाहेर आले ते राजपुरींतच राहिले. ऐसा समय पाहून सेखजीनीं शिद्दी रहिमान यांस विचारांत घेऊन सांगितलें जे, " विना महाराजांवांचून तुमची स्थापना होणार नाहीं. त्यांस पत्रें पाठवावीं आणि सरदार फौज आणवावी. " म्हणोन पत्रें

---

२१. बेलाग=दुःसाध्य.
२२. मागें पृष्ठ ५२ पहा.
२३. ' सुरुल ' असें एके जागीं आहे तें चुकीचें आहे.
२४. दफनें=पुरणे.

महाराजांस पाठविली जे, " बाजीराव व आणखी मातबर सरदार रवाना करावे." यावरून महाराजांनीं बाजीराव यांस लिहिलें जे, " तुम्हीं राजपुरीस जलद जाऊन पावावें. इकडूनही सरदार फौज रवाना होईल. " म्हणून श्रीपतराव प्रतिनिधि व फत्तेसिंग भोंसले जमावानिशीं रवाना केले. त्यांस आज्ञा केली जे, " येशवंतराव पोतनीस यांणीं रायगडचें रौंजकारण सिद्ध केलें आहे, त्या मार्गे जाऊन किल्ला हस्तगत करून येशवंतराव बराबर दिल्हे त्यांचे स्वाधीन करून पुढें राजपुरीस प्रधान यांचे कुमकेस जावें. " यावरून बाजीराव फौज सुद्धां निघोन मोठ्या मोठ्या मजली करून जलदीनें राजपुरी बा ला रा जा वर जाऊन उँतरले. त्यांस शिद्दी अबदुल रहिमान येऊन भेटून बाजीराव यांजपाशीं राहिले. हें पाहून शिद्दी राहाण जमियत करून तिघे किलियांत ठेवून बाहेर येऊन लढाईस चालून आले. लढाई मातबर जाली. त्यांत शिद्दी राहाण [ व ] बाजीराव यांणीं लढाई मांडली. शिद्दी रौंहाण रणांत ठार जाहले. फौज थकली. बाजीराव यांणीं मोर्चेबंदी जांजिरे यास केली. प्रतिनिधि व फत्तेसिंगबावा पारघाट उतरून रायगड नजीक गेले. येशवंतराव यांणीं राजकारण केलें होतें त्याप्रमाणें किल्ला हस्तगत करून खासनीस यांचे स्वाधीन आज्ञेप्रमाणें केला. आणि राजपुरीस गेले. महाराजांनीं कॉन्होजी आंगरे यांस पत्रें लिहिलीं जे, तुम्हीं आरमार व पायदळ घेऊन पाणियावरील मोर्चेबंदी करून कुमकेस जलद जाऊन पोंचावें. " तेही जाऊन पाणियांतून मोर्चेबंदी व मारागिरी बहुत केली. किल्ला बहुत जेर केला. व बाहेरून रसद पोंचणें बंदी केली. बाहेरून सरदार यांणीं मारागिरी केली. त्यावरून हवालदील आंतील हबशी जाले. आणि शिद्दी रहिमान बाहेर होते त्यांजकडे राजकारण पाठविलें जे, " तुम्ही धणी आहां, तुम्हीं येऊन संस्थान संभाळावें. " यावरून सर्व मजकूर [ ध्यानीं आणून ] व पुढें पर्जन्यकाळ प्राप्त जाला, कोंकणांत फौजा शह देऊन राहणें ठीक नाहीं, व आरमारही पावसांत नीट राहणार नाहीं, बाजतबेरसात मसलत शेवटास जाईल [ असें ] लिहिल्यावरून महाराजांनीं आज्ञा पाठविली जे, " ये समयीं शिद्दी रहिमान सरकारचे पाठीशीं आले. यांची स्थापना संस्थानीं करावी. सर्व प्रांत किल्ले घ्यावे. त्यांचे खर्चास महाल ठेवणें ते नेमून त्यांत सरकारचा अम्मल निमे व त्यांचा निमे ऐसें करून व पुढें आपलेसे करून त्यांणीं मुलकांत

२५. या राजकारणाचे कामांत ग्रांट्डफ् पोतनिसाचें नांव देत नाहीं.

२६. बाजीराव माळव्यांतून परत आल्याविना ही मसलत होईना म्हणून महाराजांनीं लौकर निघून येण्याबद्दल पत्रें धाडिलीं होतीं त्याजवरून सातान्यास न जातां ते परस्पर कोंकणांत उतरले.

२७. ग्रांट्डफ् ' रहिमान ' असें म्हणतात.

२८. कान्होजी यापुर्वी वारले होते. मानाजीनें समुद्राच्या बाजूनें आडविलें.

२९. बाजतबरसात=पर्जन्यकालानंतर.

उपद्रव न करितां तहांनीं व सरकार लक्षांनीं रहावें. ऐसा तहनामा ठरावून अ-बदुल रहिमान यांचे स्वाधीन स्थळ व संस्थान करून यांची स्थापना करून निघोन यावें. " बाजीराव व प्रतिनिधि व फत्तेसिंगबावा यांचे फौजेनें धुंदी करून राजपुरी लुटली होती व किल्ले तळा घोसाळा वगैरे ठाणीं महाल घेतले होते. यानंतर महाराजांचे आज्ञेप्रमाणें अकरा महाल त्यांजकडे ठेवावयाचे त्यांत निंमे अम्मल सरकारी व निंमे अम्मल त्यांचा ऐसें करून बरकड स्थळें प्रांत घेतला. आणि त्यांणीं सरकार लक्षें कांहीं एक कुफेर[30] न करितां चालावयाचा तहनामा ठरविला. त्याप्रमाणें शिद्दी रहिमान यांणीं मान्य केला. किलियांत तीन खासे होते त्यांणीं मान्य केला. तह ठरविला. आणि शिद्दी अबदुल रहिमान यास किलियांत नेऊन तख्तावर स्थापना केली. तळा घोसाळा, अवचितगड, बिरवाडी, सुरगड वगैरे किल्ले व प्रांत घेतला. त्याचा ठराव खर्च शिबंदी वगैरे ठराव करून बाजीराव प्रधान यांजकडे तालुका सांगितला. दरखदार, हवालदार, सबनीस, कारखानीस हुजूरचे नेमून दिल्हे. त्यांनीं प्रांताचा बंदोबस्त केला. सरदार व फौज येण्याविषयीं आज्ञा पाठविली त्याप्रमाणें निघोन महाराजांचे दर्शनास आले. महाराजांनीं बहुत तारीफ व सत्कार केला. बक्षिसें इनाम गांव वगैरे दिल्हे. रायगड परतोन घेतला. हबशी याचा तह ठरविला. शके १६[31]५५ प्रमाथीनाम संवत्सरे, आर्बा सलासीन मया व अलफ. राज्याभिषेक शके ६०.

कान्होजी आंगरे वारल्यावर[32] सखोजीस वस्त्रें दिलीं. ते सोळाशें एकावन्नांत एका वर्षानें वारले. संभाजी आंगरे यांस पद सोळाशें बावनांत दिल्हें. ते सुभा व पद करूं लागले. यावरि मानाजी आंगरे फिरंगणांत गेले होते. तेथें राजकारण करून फिरंगियाची कुमक कांहीं घेतली. साबाजी तुकाजी यास दिवाणगिरी देऊन कारभार केला. जमाव करून कुलाबियास रात्रौ येऊन, शिड्या लावून आंत उतरले. लोक मारून काढले. येसाजी आंगरे यांस धरून, डोळे काढून, कैदेंत ठेवून, फिरंगी कुमक लावून देऊन, किल्ला बळकावून राहिले. मर्द व बलाढ्य बहुत होते. यानंतर संभाजी आंगरे चालून आले त्यांशीं लढाई दिल्ही. तेथें ज्या माणसावर वार टाकावा तें दुधड करावें. वीस पंचवीस माणूस दुधड [ करून ] जातीनें मारिलें. बरकड लढाई जाली. संभाजी आंगरे मोड होऊन परत गेले. फिरोन चालोन आले. तेव्हां मानाजी आंगरे यांणीं महाराजांकडे राजकारण केलें. यावरून कुमक पाठविणें म्हणोन बाजीराव यांस आज्ञा केली. त्यांणीं कुमक पाठविली. आणि संभाजी आंगरे यांसही महाराजांनीं तें स्थळ त्यांजकडे ठेवणें लिहिलें. संभाजी आंगरे परत गेले. मानाजी

---

३०. 'फेर' कोल्हापूर प्रत.

३१. १६६५ प्रमाथीनाम असें चिटणीस प्रतींत आहे तें बरोबर नाहीं.

३२. मागें मागें पृष्ठ ६१ टीप ११ पहा.

आंगरे मर्द, चांगले माणूस, सरकार पदरीं रहाण्यासि योग्य [ म्हणून ] बाजी-राव प्रधान व खंडो बल्लाळ चिटणीस यांणीं रदबदली केली. त्यांस कुलाबा-सुद्धां वजारतमाब ऐसा किताब करार करून वस्त्रे खंडो बल्लाळ चिटणीस यां-जबराबर पाठविलीं. संभाजी आंगरे शके १६५५ यांत वारले. नंतर तुळाजी आंगरे सुवर्णदुर्ग वगैरे तालुक्यांत होते. त्यांस सरखेल पद व सुभा करार क-रून वस्त्रे दिलीं. सरकार नजराणा व ठरावाचा ऐवज घेतला.

[ पुढें ] महाराजांनीं प्रधान व प्रतिनिधि व सेनापति व सेनासाहेब सुभा व सरलष्कर सर्व सरदार बोलावून आणिले. आणि आज्ञा केली कीं, " सर्व मसलती व राजकार्यभाग पराक्रम तुम्ही जाऊन करीत आहां [ च. ] तुम्ही सर्व सरदार असून आम्ही स्वारीस निघावें ऐसें आमचें मानस. हें कसें घडतें ? " तेव्हां सर्वांनीं रुकार दिल्हा जे, " हिंदुस्थान अथवा कर्नाटक ज्या रोखें महा-राज स्वारी निघणें असेल तिकडे निघोन जवळ पास छावणी करावी. पुढें स-स्वार रवाना करून जी काय करणें ती आज्ञा करावी. ज्यांस आज्ञा होईल ते जाऊन करून येऊं, " बोलले. याजवरून सर्वांस तयार होऊन आणविलें. व खांसा स्वारीची तरतूद फरासखाना[33], डेरे वगैरे करविली. पागा, हत्ती, घोडे, तोफ-खाना, पायदळ सर्व तयारी करविली. सर्व सरदार यांणीं आपले तालुके व मसलत[34] संभाळून पांच चार हजारांनिशीं जातीनें खांसा स्वारींत असावें, ऐसें केलें. सर्वांच्या मिसळी[35] होत्या त्याप्रमाणें चार प्रधान, अमात्य, सचिव, मंत्री, उजवे बाजूस. व प्रतिनिधि, सेनापति वगैरे चार डावे बाजूस. व आणखी सरदार, मानकरी सोइरे लोक व फत्तेसिंगबावा उजवे बाजूस नेमिले. सेनासाहेबसुभा व सेनाधुरंधर [ यांणीं ] पुढें आघाडी संभाळावी सांगितलें. दुमदारीस[36] सरल-ष्कर वगैरे सरंजामी पथके नेमून दिल्हे. " कोणीएक कडी-कवाड घांस-लकडी सुद्धां उपद्रव करूं नये. व रयतेस, शेतभात [ यास व ] कोण्हाचे कुंपकाठीस[37] उपद्रव करूं नये. जें घेणें तें विकत घ्यावें. यांत जो बेकैदी करील त्याचा हात पाय तोडिला जाईल, " ऐशी ताकीद केली. कूच करणें ते दोन तीन कोसांचे करावे ऐसें केलें. आणि सुमुहूर्ते डेरेदाखल जाले. पागा हुजुरात सर्व तयारी करून उतरले. तोफखाना तयारी होऊन काढिला. व सर्व सरदार यांस

---

३३. फरासखाना=' अस्तरणागार. ' तंबु, बाड, बिछायती सामान; किंवा तें ठेवण्याची जागा.

३४. आपल्या सुभ्याचा आंतील बंदोबस्त व त्यावर येणाऱ्या परचक्राबद्दलची तजवीज ठेवून.

३५. मिसळ=योग्य स्थान. सरकारी डेऱ्याचे संबंधानें डावेकडे, उजवेकडे, पुढें, मागें असें योग्यतेनुरूप उतरण्याचें किंवा कूच करून चालण्याचें स्थान.

३६ दुमदारी ( दुम्=शेपूट. दार=असणारा, धरणारा ) पिछाडी.

३७. कुंपकाठी. ( कुंप, कुंपण, वई. काठी=डांभा, )=कुंपण वगैरे (समाहारार्थी.)

आपले तालुके व मसलतीचे बंदोबस्त राखून पांच हजार चार हजार दोन हजार फौजेनिशीं ज्याचे त्याप्रमाणे बराबर यावे नेमून दिल्हे त्याप्रमाणे येऊन उतरले. त्यांस मिसळीस रहाणें व स्वारी चालणें याचे [ निर्बंध ] नेमून दिल्हे. सेनाधुरंधर व सेनासाहेब सुभा भोंसले यांस आघाडीस नेमिलें. प्रतिनिधि व मुख्य प्रधान व अमात्य, सचिव व मंत्री उँजवे बाजूस मिसळ नेमिली. सेनापति व आणखी सरदार व पागे वगैरे यांस डावे बाजूस. पंडितराव व सुमंत व न्यायाधीश यांस [ डावेबाजूस ? ] नेमून दिल्हे. चिटणीस, पोतनीस वगैरे कारकून मंडळी यांस जामदारखान्यालगत उजवे बाजूस नेमिलें. फडणीस व दफ्तर कोठी वगैरे डावे बाजूस नेमिलें. सोयरे लोक, मानकरी व फत्तेसिंग भोंसले उजवे बाजूस नेमिले. पिछाडीस सरलष्कर व त्यांचे निसबतीचे सरंजामी आठोळे वगैरे बंडगर, कोकाटे, कडू, कांकडे हे नेमिले. हुजूर पागा डेऱ्यापुढें व शागीर्दपेशा[39] लोक वगैरे जिकडील तिकडे मिसळी नेमून दिल्ह्या. स्वारी चालणे ती मिसळी नेमिल्याप्रमाणें आघाडी पिछाडी डावें उजवे बाजूचे सरदार फौज यांणीं आपलाले मिसळीस चालावें. गुलगलबा कांहीं एक होऊं नये. पादशाही स्वारींत महाराज होते त्या अन्वयें सर्व मातबर मुत्सद्दी प्रधान व सरदार यांणीं अंबाऱ्यांत बसोन, सरकारच्या अंबारीचे पाठीमागें जनानखाना त्यामागें चाळीस पन्नास अंबाऱ्या चालाव्या. पुढें तोफखाना, त्यापुढें ढाला[40] व निशाणें व त्यापाशीं गारद व करोळ[41] व पागा चालावी. सर्वांपुढें बिनीवाले[42] सेनाधुरंधर यांणीं चालावें. निशाणामागें आघाडीचे सरदार यांचे लोक चालावे. त्यामागें जिलीबें[43] नानाप्रकारचीं रणवाद्यें. त्यामागें जिलबीचे हत्ती, घोडे, रथ, सांडणी यांणीं चालावें. त्यामागें विटे[44], बाण, भाले. त्यामागें कोयाट्या, खासबारदार[45] यांणीं चालावें. त्यामागे नगारखाना, शहाजाने. त्यामागें वाजंत्री व धाडी[46]. त्यामागें चोपदार, भालदार चालावे. धुरळा उडूं नये. याठेनें सक्के[47] व पखाला यांणीं

३८. वर प्रतिनिधीची मिसळ डावेबाजूस असें म्हटलें आहे.

३९. शागीर्दपेशा=( शागीर्द=शिष्य. पेशा=धंदा ) सेवकमंडळी, परिजनसमूह.

४०. ढाला=( सरकारी ) निशाणें, ध्वज.

४१. गारद ( Guarda, Guard गार्डद, ) बंदुखी ( कवायत शिकलेले ) शिपायी—हे बहुधा परदेशी अगर मुसलमान असत.

करोळ=बंदुखी स्वार.

४२. बिनीवाला=( बिनी=नाक, पुढील भाग. वाला=वान्; 'आहे ज्यास ' ह्या अर्थी प्रत्यय ) अग्रेसर, धुरंधर ( पुढें चालणारा ).

४३. जिलीब=सेवकाची रांग, परिजनसमूह.

४४. विटें=विटा, इटा, नामक एके प्रकारची बर्ची—ती वापरणारे.

४५. खासबारदार=खांद्यावर शस्त्र इ० वाहणारा.

४६. धाडी=मुसलमान गायक किंवा स्तुतिपाठक. स्वारीच्या वेळीं राजाच्या पुढें यांणीं उच्चस्वरानें स्तुतिपाठ करावयाचें.

४७. सक्का=पाणी शिंपणारा. 'सक्कातु-जलदः स्मृतः ' राजव्यवहार कोश. मूळांत 'सक्के ' असें आहे.

पुढें शिडकाव होत असावा. याप्रमाणें दोन तीन कोस चालून डेरेपर्यंत [48]कोरबंदीचे लोक [ यांचे ] मुजरे घेत जावे. ऐसें केलें. याप्रमाणें दोन तीन मजली करून उंब्रजेचे मुक्कामीं गेले. पुढें कर्नाटक प्रांतीं जावयाचें तेव्हां सर्व अष्ट प्रधान, सरदार यांणीं विनंति केली जे, "सरकारची स्वारी छावणी येथें व्हावी. येथून जी मसलत करणें असेल ते एकेक सरदार यांस आज्ञा होत असावी. त्याप्रमाणें जें कार्य अघटित असेल तेंही जाऊन करूं. सरकारांनीं जावयाजोगें कार्यच नाहीं," बोलले. यावरून कराड नजीक उंब्रजेवर छावणी केली. प्रधान सर्व व सरदार सहवर्तमान शिकारीस जावें. उभे राहणें ते नेमिले ठिकाणीं ज्यांनीं त्यांनीं रहावें. ज्याजकडून शिकार जाईल त्यांणीं अर्ज करून अन्याय माफ करून घ्यावा. पुन्हा शिकार साधून द्यावी. श्रीपतराव प्रतिनिधि यांस अयणीस उदाजी चव्हाण चोरून मारून गांवगन्ना ऐवज घेण्यास चुकेनात याजवरून त्यांचे फौजेनिशीं जावें [अशी] आज्ञा केली. त्यांणीं जाऊन चव्हाण याजवर जरब दिली. "याजवर तुम्ही पुंडावे न करितां सेवाधर्म आहे तसें करून सुरळीत वर्तावें. व बंदोबस्त करून घेऊन या राज्यांत अगर करवीरचे संस्थानीं रहावें हें उत्तम [ असें ] न करणें तरि लढाईस उभें रहावें." यावरून त्यांणीं "या उपरि आपण सरकार आज्ञेप्रमाणें सुरळीत वर्तणूक करितों," ऐसे [49]करार-दाद ठरावून खातरजमा करून दिल्ही. यावरून प्रतिनिधि चव्हाण यांस घेऊन महाराजांपाशीं आले. भेट होऊन निखालसता होऊन बहुमान करून निरोप दिल्हा. दुसरे वर्षी प्रतिनिधि यांजबराबर तोफखाना व सामान देऊन, मिरजेचें ठाणें मोंगलाकडे होतें तें घ्यावें म्हणोन [ त्यांस ] रवाना केलें. ते जाऊन मोर्चेबंदी करून तोफा लावून मारगिरी केली. यावरून किल्ला तहास येऊन दिल्हा. यावरि महाराजांची स्वारी किल्ला पहाण्यास गेली. पाहून [50]डुबल यांस किल्ल्याचा सुभा सांगून, हवालदार दरखदार लोक नेमून देऊन, किल्ल्याचा व प्रांताचा बंदोबस्त करवून स्वारी परत आली. बाजीराव प्रधान यांस आज्ञा केली जे, "तुम्ही आपले सरंजाम फौज सुद्धां जाऊन तासगांव वगैरे मोंगलाई अमलाचीं-ठाणीं राहिलीं आहेत तीं घ्यावीं. सुरापूर, चित्रदुर्ग वगैरे पाळेगार यांचे खंडणीबद्दल ऐवज राहिले असतील ते फडशा करून घ्यावे. कोणीं [51]फिसात केली त्याचें पारपत्य करून प्रांत व ठाणीं व किल्ले सरकारचे घ्यावे." यावरून जाऊन तुंगभद्रेपर्यंत सर्व खंडण्या घेतल्या. ठाणीं, किल्ले, प्रांत सरकारी महाल यांतील

---

४८. कोरबंदी=( सलामी करतां ) फरा, रांग.

४९. करारदाद=( करार=ठराव, कबुलायत. दाद=फिर्याद, तक्रार )=करार मदार या अर्थी.

५०. हे डुबल कोण ?

५१. फिसात=अडथळा, फंद.

अंमल बसवून सुरळीत केले. यावरून पलीकडील सर्व संस्थानीं यांचे वकील आले. त्रिचनापल्लीपर्यंत पाळेगार यांच्या खंडण्या आल्या. त्या घेऊन सर्व वकील घेऊन महाराजांपाशीं आले. सर्वांचे आबसाल करून घेऊन सन्मान करून निरोप दिल्हे. याप्रमाणें शके १६५८ सैंबा सल्लासीन मया व अलफ यांत जाऊन दोन वर्षें छावणी चंद्रजेवर जाली. श्रीचाफळीं जाऊन, श्रीचें दर्शन करून, पूजा ब्राह्मणभोजन करून सातारां आले. शहरचे देवांच्या पूजा करविल्या. शहरांत गुढ्या उभ्या केल्या. रस्तेंत सडे घालून रांगोळ्या घालून सर्व नगर अलंकृत केलें. सर्व लोक पुढें सामोरे नजरा घेऊन आले. रस्त्यांत सर्व घरीं स्त्रिया आर्त्या घेऊन उभ्या राहिल्या. वाड्यांत रांगोळ्या वगैरे करवून समारंभें करून प्रवेश केला. शके मजकूर.

संभाजी राजे श्रीमहादेव देवदर्शनास कुटुंबासह आले. तेथून प्रतापगडचे देवीस आले, तेथून महाबळेश्वर करून खालीं आले. महाराज स्वारी महाबळेश्वरास गेली. खालीं आल्यावर वेदगंगेवर भेटी जाल्या. तेथून सातारां बराबर आणिले. महिनाभर राहून मेजवान्या, वस्त्रें, हत्ती, जवाहीर, घोडे वगैरे देऊन रवानगी केली. दोन लक्ष रुपये खर्चास दिल्हे. शके १६५६.

संभाजी आंगरे शके १६५५ यांत वारले. तुळाजी आंगरे यांस सरखेल पद व सुभा दिला. शके मजकूर. मानाजी आंगरे यांणीं कुलाबा घेऊन येसाजी आंगरे धरिलें. त्यांस वजारतमाब किताब व कुलाबा सुभा त्याजकडे [ सांगून ] सालाबाद नजर सात हजार रुपये व तीन हजार जिन्नस मोईनैयाचा पाठवीत जावा [ असें केलें. ] सरकारी दरखदार हवालदार लोक किल्ले यांस नेमून दिल्हे. तालुक्याचा हिशेब देऊन शिबंदी खर्च जाऊन पेषकशी द्यावीसें केलें. शके १६५७.

नारो शंकर सचिव वारले. शके १६५८. यांस पुत्र नाहीं. गोत्रज दत्तपुत्र घेतले. चिमणाजी नारायण यांस सचिव पद [ देऊन ] तालुका सांगितला.

[ पुढें ] बाजीराव बल्लाळ प्रधान यांस बोलावून आज्ञा केली जे, " कोंकण प्रांतीं फिरंगी यांजकडे साष्टी, वसई वगैरे तालुका मर्धांच राहिला. तिकडे फौज सुद्धां हशम वगैरे घेऊन जाऊन, मसलत करून ते जागे घ्यावे. कोंकण प्रांत निर्वेध करावा." हे मसलत सांगतली. ते पुण्यास जाऊन चिमणाजी बल्लाळ यांजबरोबर राणोजी शिंदे, मल्हारजी होळकर यांणीं हिंदुस्थान प्रांतीं बहुत कामें केलीं, त्यांजला देऊन तालुके देऊन वाढवून महाराजांस भेटविले, आणि

---

५२. चिटणीस प्रतींत १६५१ असें आहे तें चुकीचें.

५३. मागें पृ० ६१ व ६७ पहा.

५४. मोईन=दरसाल ? ठरलेला ?

५५. पेषकशी=नजर.

फौजसुद्धां बराबर दिल्हे ते खालीं उतरोन गेले. आणि खंडोजी माणकर व रामाजी महादेव यांस लोक देऊन पुढें साष्टीवर रवाना केले. त्यांणीं जाऊन मोर्चेबंदी करून किल्ला जेर केला. आणि भेदाचें राजकारण करून साष्टी घेतली. शके १६५८. मागाहून शंकराजी नारायण प्रधान यांजकडील सरसुभेदार कोंकणचे आणखी सामान देऊन रवाना केले. ते हे एकत्र होऊन गोखरांचे बंदरावर वसईस शह देऊन राहिले. हें वर्तमान गोंव्यास फिरंगी यांस समजल्यावरून त्यांणीं पाण्यांतून पलटणें व तोफा वगैरे तयारी करून मोठ्या गरनाळा ऐसे भरती करून किलियांतही भेद करून अकस्मात येऊन साष्टी घ्यावी ऐसा बेत केला. हें वर्तमान मुंबईस जनराल इंग्रेज होते त्यांस समजलें. महाराजाशीं इंग्रजांचा स्नेह व तह होता. त्यांणीं बाजीराव यांस बातमी कळविली जे, "फिरंगी तयार जाले. साष्टींत फितूर जाला. साष्टी घेऊन तुमची फौज बुडवितात." हें वर्तमान येतांच मल्हारजी होळकर दहा हजार फौजेनिशीं पुढें रवाना केले. ते जलद जाऊन पोंचले. फिरंगी चालून आले. त्यांणीं बुरुजावरि मारगिरी चालविली. प्रधान यांजकडील सरदार यांनीं किल्ल्यांतील फितूर वगैरेचा बंदोबस्त करून तोफांची मारगिरी फिरंगियावरि बहुत केली. लढाई शर्तीची जाली. तेसमयीं त्यांचे तरांडींतील दोन कप्तान मुख्य होते ते गोळे लागून उडोन फिरंगी नामोहरम होऊन निघोन गेले. यानंतरि फिरंगी यांचे गोंवें वगैरे तालुक्यांत धुंदी करावी [ याकरितां ] त्र्यंकटराव नारायण ब्राह्मण सरदार घोरपडे यांचे पदरचे पूर्वींचे, घोरपडे म्हणवितात, ते कांहीं हशम दहा हजार सामान घेऊन रवाना केले. ते जाऊन गोंवेपर्यंत त्यांचा तालुका मारून लुटून जाळून बेचिराखें केला. चिमणाजी बल्लाळ व राणोजी शिंदे वसईवर जाऊन मोर्चेबंदी करून बहुतच कमालीची लढाई हल्ला करणें, सुरुंग चालविणें, तोफांची मारगिरी करणें, जातीनें मोर्च्यांत जाऊन मोर्चे चालविणें, ऐसें केलें. किल्ल्यांतून मारगिरी त्यांणीं बहुत केली. त्यांत दहा हजार पर्यंत हशम लोक कामास आले. व बाजी भिवराव सरदार तेथें हल्लेंत पडले. बाजीराव प्रधान पुण्यांत राहून वरचेवरि लोक व खजीना व सामान यांची पुरवणी पाहिजे तशी केली.

बाजीराव यांस तीन पुत्र जाले. एक बाळाजी बाजीराव व दुसरे रघुनाथ बाजीराव, तिसरे जनार्दन बाजीराव. त्यांत बाळाजी बाजीराव प्रबुद्ध जाले.

---

५६. साष्टीची बखर पहा.

५७. यास हल्लीं ' गोखिरवें ' म्हणतात.

५८. ' पाणी पुरणावरि ' असा चिटणीस-प्रतीचा पाठ आहे.

५९. बेचिराख=दीपहीन; इतका ओसाड केला कीं दिवा लावण्यासही कोणी ठेविलें नाहीं.

६०. बाजी भिवराव हे तारापूरचा कोट घेत असतां हल्ल्यांत पडले.

त्यांस अंबाजीपंत पुरंदरे मुतालीक [ यांसुद्धां ] महाराजांपाशीं नेहेमीं ठेविलें. यांणींही महाराजांपाशीं रहावें. पुरंदरे यांचे विचारें चालून महाराजांची स्वारी शिकारी सेवा करावी. ऐसें करून सेवेंत ठेविले. चिमणाजी बल्लाळ यांस पुत्र सदाशिव चिमणाजी जाले. अंबाजीपंत पुरंदरे यांस दोन पुत्र. सदाशिव अंबाजी व महादाजी अंबाजी जाले. बाजीराव यांणीं मस्तानी म्हणून कळवंतीण ठेविली [ होती ] तिजला पुत्र जाला. त्याचें नांव समशेर बहादर ऐसें ठेविलें. श्रीपतराव प्रतिनिधि यांस संतान पुत्र नाहीं. अंबुराव बाबुराव हणमंते मजमदार वारले. त्यांचे पुत्र अप्पाजी अंबुराव [ यांस ] अमात्य पद दिल्हें. बादली वस्त्रें, कलमदान रुप्याचें दिल्हें. होनाजी अनंत न्यायाधीश वारले. त्यांचे बंधु काशी अनंत यांस पद बहुमान दिल्हे. देवराव मेघःशाम राजाज्ञा पंत यांचे मुतालीक कर्ते निघाले. कृपेंत वागूं लागले. त्यांजकडे राजाज्ञा निजबल कारभार सरकार विल्हेचा सांगितला. व इंदापूरची देशमुखी महाराजांची, त्याची मुतालकी सांगितली. त्यांचे बंधु यांजकडे तोफखाना नारोराव मेघःशाम यांजकडे सांगितला. आनंदराव सुमंत वारले. त्यांचे वडील पुत्र होते. परंतु विठ्ठलराव अनंत हे देवरावाचे जांवई वडील पुत्र सामान्य याजमुळें आग्रह करून, पद विठ्ठलराव यांस देवराव यांणीं देवविलें. सुलतानजी निंबाळकर यांजकडे सरलष्करी होती त्यांणीं मोंगलाईत राजकारण रोजगार दुलंग केला. याजमुळें दूर करून रावलजी सोमवंशी यांस बहुमान वस्त्रें तालुका सांगून सरलष्कर पद सांगितलें.

मानाजी आंगरे यांणीं फिरंगियांची कुमक घेऊन सोइरोबा प्रभु कारभारी करून कुलाबा शिड्या लावून जवामर्दीनें घेतला. बहुत मर्द पाहून त्यांजला वजारतमाब किताब दिल्हा. आणि कुलाबा तालुका देऊन निराळेंच संस्थान दुसरें करून यांजकडे चालविलें. कुलाबा घेण्यास फिरंगियाची कुमक आणिली. ते किल्ला सोडीनात. तेव्हां बहुत शर्तीची लढाई मारिली. जातीनें तलवार करून पंचवीस तीस खासे फिरंगी दुखड केले. जातीनें फार बलवान् होते. फिरंगी सर्व कापून काढून स्थळ रक्षिलें. सोइरोबा यांस हुजूर पाठाविलें. चिटणीस यांचे हातें निखालसता सरकार लक्षांत वागण्याची केली. यावरून व बाजीराव [ प्रधान ] यांणींही तारीफ केली, लिहिली, यावरून बहुत कृपा महाराजांनीं त्यांजवर ठेविली. जिवाजी खंडेराव चिटणीस यांस वस्त्रें बहुमान देऊन पाठवून तालुका नेमून दिला.

दिल्ली तख्तावर महंमदशाह बसोन पादशाही करीत होते, तेव्हां सर्व वजीर

६१. 'अपाजी बाबूराव' चिटणीस प्रत.

६२. 'वडील पुत्रासमान' असें असावें.

६३. दुलग=हिकडला तिकडला, दोहींकडला, दुटप्पी.

६४. मागें पृष्ठ ६१।६७।७१ टीप ५३ पहा.

व अमीर मुसलमान लोक यांणीं विचार केला कीं, " शाहू राजे यांची कुमक घेऊन पादशाही झाली. हिंदूशीं तह केला. दरसाल बाजीराव येऊन स्वारी करून दिल्ली आलीकडे पलीकडे अंमल बसविला. सेनासाहेब सुभा यांणींही बंगाला वगैरे अम्मल बसविला. अयोध्यापर्यंत स्वारी करितात. तह जाला त्याप्रमाणें चालत नाहींत. पादशाहा तरि हिंदु लोकांचे विश्वासावर भरंवसा ठेवितात. शाहू राजे यांजकडील देवराव हिंगणे बाळाजीपंत ठेवून गेले त्यांचे हातें सर्व कारभार [होतो.] मुखत्यारी पादशाहानीं त्यांजवर ठेविली. ते बहुत द्रव्यवान् होऊन वजीरच जाले. सर्व पादशाई बुडाली. पादशहास हिंदूंवर मसलत करणें करावी म्हणून मसलत दिली असतां मानत नाहीं." यावरून विचार केला जे, " इराणचे पादशाहाशीं राजकारण करून, त्याची कुमक घेऊन शाहू राजे यांजवर मसलत करावी." म्हणून ठरावून वकील, पत्रें पाठविलीं जे, " पादशाहा बेहोष जाले. शाहू राजे हिंदु यांणीं सर्व दिल्लींत व भोंवतां अंमल बसविला. त्यांचे वकील कारभारी वजिरी करितात. मुसलमानी पादशाई गारद होऊन ही पादशाई घेतात. त्यास पादशाई राखण्याचे वाली आपण आहां. कुमक करून दुसरा पादशाहा तखतावर स्थापून हिंदूंवरि स्वारी करून दिल्लीची पादशाई रक्षावी." त्याजवरून त्यास ही गोष्ट अवश्यक होतीच. " दिल्लीची पादशाई हिंदुपति करितात. ते कुमकेस म्हणून फौज पाठवून, तेथें आपला सुभा ठेवून, तें हिंदुस्थान आपले पादशाहींत आणावें." म्हणून विचार करून तामस कुलीखान म्हणोन मातबर सरदार फौज बहुत बराबर देऊन रवाना केले. ऐशीं हजार घोडे व पंचवीस हजार गारद यापमाणें सामान व तोफखाना घेऊन निघाले. हें वर्तमान पादशहास समजलें यावर विचार केला कीं, " आपले सर्व मुसलमान अमीर फितुरी हरामखोर जाले. पादशाई इराणीस देतात. याची कुमक करणें व पादशाई रक्षणें शाहू राजे यांजवांचून होत नाहीं. येथें आपण फौज जमा करून मसलत करावी तरि विश्वास कोणाचा येत नाहीं." म्हणून देवराव हिंगणे महाराजांकडील वकील यांस बोलावून मसलत सांगितली जे, " असा विचार प्राप्त जाला. येविशीं आम्ही शाहूराजे व बाजीराव प्रधान यांस फर्मान लिहितों. तुम्हीं हें सर्व राजकारण केलें हें लिहून पुढें करण्याचा व जलद फौज येऊन पावावी [ असें करणें. त्याचा ]

६५. बाळाजी विश्वनाथ–हे हिंगणे पुढें मोठे समर्थ झाले. हल्लीं यांचे वंशज नाशिक जिल्ह्यांत आहेत.

६६. गारद=नष्ट.

६७. वाली–आश्रयदाता, संरक्षक, कैवारी.

६८. ' इष्ट ' ह्या अर्थी.

६९. ' पायदळ ' कोल्हापूर प्रत.

७०. ' स्वामिद्रोही हरामखोरः ' राजव्यवहार कोश.

७१. ' फर्मानं राजपत्रकम् ' राजव्यवहार कोश.

खर्च जो लागेल तो येथून पावता होईल. तयारीस व वाटेनें येण्यास खर्च लागेल तो वरचेवरि रवानगी करावी. आणि जलद फौज व सरदार येऊन पावावे. त्यांचें[७२] सामान भारी आहे, व आपले सर्व अमीर फितूर आहेत. दोन्हीस पुरावया-जोगी दोन लक्ष फौज यावी." त्याप्रमाणें सांगून रवानगी केली. जो पैका मसलतीस लागेल तो निमे अंमल हिंदुस्थानपैकीं सुभे लावून द्यावे, ऐसें करा-[७३]रदाद होऊन पत्रें आलीं. एक घटकेचा विलंब न करितां येऊन पादशाही रक्षावी. ऐशीं [ पत्रें ] पावलियावरून बाजीराव प्रधान यांस महाराजांनीं बोला-वून आणून आज्ञा केली कीं, " हे मसलत मोठी प्राप्त जाली. तुम्हीं सर्व त-यारीनें फौज जमेल तितकी जमवावी. सेनापति, सरलष्कर हे फौजेचे सरदार पाहिजेत ते बराबर घ्यावे." सेनासाहेब सुभा यांस पत्रें लिहिलीं जे, " तुम्ही पन्नास हजार फौजेनिशीं जाऊन बाजीराव यांस सामील व्हावें." ऐशी रवानगी केली. व सेनापति सरलष्कर वगैरे सरंजामी यांस जलद तयार होऊन निघावें [ अशीं ] पत्रें पाठविलीं. चिमणाजी बल्लाळ यांणीं वसईचे मोर्चे देऊन वसई जेहर केली. शिंदे, होळकर सरदार फौज या मसलतीस गुंतली. फत्ते हो-ण्याचा समय. फिरंगी याचे मुलकांत शहास कांहीं फौज गुंतली. हें सोडून जलद जाणें कसें घडतें ? हे बाजीराव यांणीं विनंति केलियावरून प्रसंग बहुत कठीण, दिल्लीचे पादशाईस धक्का पोंचला असतां पुढें सर्व मसलत आपणावरीच येणार. दोहीकडील मसलत एक वेळ प्राप्त जाली. यास्तव चिमणाजी ब-ल्लाळ यांस पत्रें लिहिलीं जे, " तुम्ही जी कस्त असेल ती करून फिरंगी याज-कडील मसलत आटोपून वसई ठाणें सर करून फौजसुद्धां जलद हिंदु-स्थानांत फौजा जाण्यास पोहोंचवावें " लिहिलें. यावरून चिमणाजीआपा यांणीं जलदी करून बहुत कजाखी[७४] करून वसई घेतली. शाके १६६१ वैशाख वद्य २ द्वितीयेस फिरंगी जेर होऊन तह केला. गोमंतक व महाल त्यांजकडे राहिले. ते ठरावून बाकी फिरंगाण सर्व सरकारांत आले. त्याचा तह ठरावून आले. पर्जन्यकाळ जाला यांत फौजेची तयारी सर्व करून, मातबर म-सलत लाख फौजेवांचून शेवटास जाणार नाहीं, म्हणून जमाव करून शाके म-जकुरीं दसऱ्यास डेरेदाखल जाले. आणि प्रांत माळवे यांजकडील पंचवीस हजार तयारी करविली. उदापूर, जयपूर व जोतपूर व राजेरजवाडे सर्व हिंदू सरदार यांजकडे वकीलपत्रें पाठविलीं जे, सर्वांनीं तयारी करावी. शिंदे, होळकर पुढें रवाना केले. त्यांणीं व सर्व राजे त्या प्रांतींचे यांणीं एक होऊन लाख फौज पुढें जावी तों आपण येथील फौज व सरदार सर्व हुजुरात सुद्धां सर्व जाऊन

---

७२. त्याचें=इराणीचें.

७३. मुकरर. मागें पृष्ठ ७० टीप ४१ पहा.

७४. कजाखी=साहस, साहसपूर्वक लढाई.

पावावेंसें केलें. फौज व सरदार जमवीत कूच करीत चालले. शिंदे, होळकर व सर्व राजे पादशाईंतील एक होऊन पुढें जमले. बाजीराव व सर्व सरदार हुजुरात फौज शाहूराजे यांणीं रवाना केले. दोन लक्ष फौज आपणावरि येते, सेनासाहेब सुभाही तिकडून निघोन पन्नास हजार फौज जमवून पुढें आले, हे बातमी इराणी यास पावली. यावरून आपण जलदी करोन जाऊन फौज पोहोंचली नाहीं तों पोहोंचावें, मसलत तरि शेवटास जात नाहीं, परंतु दिल्ली लुटून माघारें जावें तरीच परिणाम आहे ऐसें समजोन पंचवीस तीस कोस ऐशा रात्रंदिवस मजलीं मातबर[75] करीत दिल्ली नजीक येऊन पावावें ऐसें करून निघाले. ते पिशॉवर[76] येथें येऊन आणखी जमाव करून लाहुरास आले. तेथें पठाण होते ते सुभे आडवे जाले. त्यांस आम्ही दिल्लीचे पादशाहीचे कुमकेस जातों, हिंदू जमाव करून ती पादशाही घ्यावयास येत आहेत, याउपरि आपला धर्म व मोठे[77] पिरांचे जागे व मसिदा कांहीं रहाणार नाहींत, ऐसें समजावून सल्लाह करून पुढें आले. दिल्ली नजीक आले तों पादशाहींतील सरदार फौज [ यांणीं ] राजकारण केलें. ते जाऊन सर्व त्यास मिळाले.[78] दिल्लींत येऊन पावून पादशहा कैद केले. आणि पादशाही खजीना, जवाहीर, हत्ती, घोडे व दौलत जप्त करून कोट्यानुकोट अर्बुद संख्या द्रव्य अगणित सांपडलें. पादशहाच्या बहिणी बेट्या यांशीं निके[79] लाऊन नेल्या. मातबर सर्व व सावकार सर्व लुटले. याजवरून दिल्लीचे काजी यांनीं सर्व रयत जमा करून व फितुरांत सरदार न होते ते सर्व जमून जागचे जागां तांमस कूली[80] याची फौज मारूं लागले. दिल्लींत गर्दी जाली. दहा वीस हजार माणूस मेलें गेलें. यावरून सर्व दौलत त्यांणीं लष्करांत खजीना वगैरे सर्व पोंहोचवून शहर लुटलें. कित्येक अमीर यांचे कबिले धरून नेले. लक्षावधि रयत मारिली गेली. गर्दी जाली. परंतु शहरची रयत लष्करावरि चालून जाऊन लष्कर मारूं लागली. तेव्हां आपला परिणाम लागावयाचा नाहीं. शाहू राजे यांची फौज येऊन पावल्यावर आपणास गारद करून नाश करितील. हें समजोन अपरमित दौलत सांपडली ही जाऊन कशी पावेल, मधींच हिंदू नेहतील, म्हणून कूच केलें. द्रव्य जाण्यास उंट, हत्ती, छकडे, गाडे भरले. तोफा टाकून तोफांचे गाडे भरले. शेवट मोत्यांच्या माळा व जवाहिराच्या घोड्याच्या गळ्यांत ओझें जाण्यास केल्या. आघाडी पिछाडीस मेखा सोन्याच्या केल्या. आणि अजमशाहा[81] यास काढून लष्करांत नेऊन मेजवानी करून पादशाहीवर

७५. मातबर=मोठ्या.

७६. 'पेशावर' असावें.

७७. पीर=गुरु, उपदेष्टे.

७८. या फितुरांत निजाम उल्मुल्क व सादतखान हे होते असा जबर वहीम आहे.

७९. निका=( हीन ) विवाह.

८०. तामसकूली=नादिरशहाकुली, ताहमस्प हा त्याचा पहिला यजमान होय.

८१. 'महमदशहा' असें पाहिजे.

बसवून कारभार वजीरी निजाम उल्मुलुख याजकडे सांगितली. आणि निघोन मातबर मजली करीत गेले. पादशाही सर्व दौलत नेली व शहर लुटलें गेलें. कबिले नेले. शहरांत काय जावें म्हणून अजमेरीसच कांहीं दिवस राहवें म्हणून राहिले. हें वृत्त बाजीराव जलदी करून नर्मदातीरीं गेले तेथें दिल्ली लुटली गेली, दौलत सर्व लुटून पादशाह कैद केला, अजमशाह सोडून पादशाहीवर बसवून माघारे इराणी जलदी करून गेले, ऐशी बातमी येऊन पावलियावरून तेथेंच मुक्काम करून राहिले. सर्व एक होऊन जलदीनें तामसखान यास वाटेंत गांठावें, अटकेपर्यंत जावें, शेवट अटकेपर्यंत जाऊन इराणीचे पादशाहीवरच मोहीम करावी, दौलत माघारी आणावी, इराणीची पादशाही बुडवावी, ऐसा विचार केला. सर्व सरदार यांस व राजेरजवाडे यांसही याप्रमाणें पत्रें पाठविलीं जे, " येथून आम्ही चाली करितों तुम्हीं सर्वांनीं जलदीनें चलावें. " म्हणून कूच केलें. तों बाजीराव यांचे शरीरीं व्यथा निर्माण झाली. ते दिवसेंदिवस अधिक होत चालली. शेवट शके १६६२ वैशाख वद्य षष्ठीस समाप्त जाले. पुढील मसलत होणारानुरूप राहिली. तामसकुली व इराणी यांस ईश्वरांनीं बक्षीस दिल्हें. त्याप्रमाणें घेऊन सर्व दौलत नेली. ठिकाणीं जाऊन पोंचले.

बाजीराव गेले हे संधि पाहून तुळाजी आंगरे यांणीं कुलाब्यावर मसलत केली. चालून गेले. हें वर्तमान महाराजांस मानाजी आंगरे यांणीं लिहिलें यावरून चिमाजी अप्पा यांस आज्ञा केली जे, " तुम्हीं जाऊन कुमक करणें. " यावरून बाळाजी बाजीराव व चिमणाजी बल्लाळ गेले. लढाई जाली त्यांत तुळाजी आंगरे [ यांचा ] मोड जाला. पळून गेले. इतक्यांत रेवदंडास वगैरे राजकारणें आलीं. ते मसलत करावी तों बाजीराव वारले ही खबर आलियावरून निघोन पुण्यास आले. उत्तरकार्य बहुत पैका खर्च करून केलें. महाराजांनीं पत्रें येण्याविशीं पाठविलीं, यावरून चिमणाजी बल्लाळ व बाळाजी बाजीराव सातारां आले. खंडोजी माणकर व संकाजी नारायण सरसुभा कोंकणांत कांहीं फौज चिमणाजी बल्लाळ [ यांणीं ] ठेविली होती. बाळाजीराव यांस प्रधान पदाचीं वस्त्रें बहुमान यथा पद्धतीनें ज्येष्ठमासीं दिलीं. आणि बाळाजी बाजीराव यांस आज्ञा केली कीं, " बाजीराव यांणीं थोरले बाळाजीपंत यांचे मागें बहुत सेवा निष्ठेनें करून मोठीं मोठीं कार्यें करून दाखविलीं. शेवटीं इराणीचें पारपत्य करून बादशाही स्थापावी म्हणोन रवाना केले. तेथें आयुष्य थोडें जालें. इराणींनीं जी पादशाही दौलत लुटून नेली ते अटकेपार जाऊन,

८२. ही नादिरशहाच्या स्वारीची हकीकत पुष्कळ ठिकाणीं मुसलमानी व इंग्रजी ग्रंथांस अनुकूळ नाहीं. बखर लिहिणारास दिल्लीच्या दरबारची माहिती कमी होती असें दिसतें. तसेंच भोपाळ येथें शके १६६० सालीं निजामास आडवून त्यापासून माळवा वगैरे प्रांत घेतले. त्याची हकीकत बखर लिहिणारानें मुळींच गाळली आहे.

इराणी पादशाचें पारपत्य करून, दौलत माघारी आणावी ऐसा मनोदय उमेद धरिली असतां ईश्वराचे इच्छेनें घडून [असें] आलें. त्यास त्यांचे पुत्र तुम्ही. त्याप्रमाणें पराक्रम करून सेवा करावयास योग्य आहां. बाजीराव यांचा हेतु राहिला व आमचा संकल्प दिल्लीची पादशाही कमजोर जाली, [ती] इराणी आले याजपासोन रक्षोन निम्मे हिंदुस्थान घ्यावें लिहिलें. ते पादशाही रक्षून हिंदुस्थान सर्व आपलें करावें ऐसा [बेत] केला तो सिद्धीस तुम्हीं न्यावा. अटकेपार घोडे चौलवावे." ऐशी आज्ञा करून पुण्यास जावयास निरोप दिल्हा. ते पुण्यास जाऊन आपले सर्व दौलतीचा बंदोबस्त केला. संकाजी नारायण व माणकर रेवदंडा याचे मसलतीस कोंकण प्रांतीं ठेविले. त्यांणीं रेवदंडा शके १६६२ सन मजकुरीं पौष शु॥ प्रतिपदेस घेतला. निशाण चढाविलें. धारावी, येशवंतगड, मनोहरगड, मांडवी, घोडबंदर, उरण देखील[८४] प्रांत हबशी व फिरंगी यांणीं घेतला होता तो सोडविला. कोंकण प्रांत सर्व निर्वेद झाल्यानंतर चिमाजी बल्लाळ पौष शु॥ एकादशीस शके मजकुरीं वारले.

पुढें बाळाजी बाजीराव व सदाशिव चिमणाजी सातारां येऊन विनंति केली, "हिंदुस्थान प्रांतीं जाण्यास आज्ञा करावी." यावरून महाराजांनीं आज्ञा केली कीं, "तुम्ही प्रथम स्वारीस जातां, बहुत सावधतेनें, बहुत दूरवर मोठे मसलतीस न गुंततां, स्वारी करून परत लौकर यावें." यावरून पुण्यास निघून जाऊन फौजेस नालबंदी एकसाली आगाव तयारी दरबेजमीस देऊन पुढें रोजमुरे आठवडे व दुमाही ऐसे बांधून सरदार व एकांडे व शिलेदार व सरंजामी [यांस] घोडेमाणूस व पोटगी पुरावयाजोगे ऐसें करून दरमहाचे दरमहा पावावें ऐसें करून देऊन गारद व पायदळ व तोफखाना फौज व सरंजामी लोक याप्रमाणें तयारी करून हिंदुस्थान प्रांतीं स्वारीस सुमुहूर्तें निघाले. बरावर शिंदे, होळकर व पवार व पिलाजी जाधव ऐसे सरदार फौजेसुद्धां घेतले. पुणें येथें सदाशिव चिमणाजी ठेविले. कारभारी बरावर महादाजी अंबाजी पुरंदरे घेतले. खानदेश बराणपुराहून माळवे प्रांतीं जाऊन सर्व संस्थानी यांच्या खंडण्या घेतल्या. आणि छावणी करून एक वर्ष राहिले. रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांणीं कटक जगंनाथ घेऊन पुढें हिंदुस्थान अयोध्यापर्यंत स्वारी कारितात, खंडण्या घेतात, [हें पाहून] हिंदुस्थान प्रांत आपणाकडे स्वारीस महाराजांनीं नेमून दिला आहे म्हणून त्या प्रांतीं निघून गेले. भोंसले यांचें म्हणणें [कीं,] तुम्हांस "जेथपर्यंत

---

८३. हें भाकीत पुढें (१७५८) किती सिद्धीस गेलें तें पाहण्यास शाहूमहाराज राहिले नाहींत!

८४. देखील=सह, समवेत, सुद्धां, या मूळ अर्थावरून 'देखील' याचा प्रस्तुत कसा प्रयोग होतो तो पहा.

साधेल, घ्याल, तें तुम्हीं घ्यावें. आम्हांस जेथपर्यंत साधेल तें आम्ही घेऊं." ऐशीं बोलणीं पडलीं. उभयतांही त्या प्रांतीं चालून गेले. त्यांत कटकट पाडली. लढाई जाली ते समान होऊन उभयतां सरोन राहिले. आपणांत कटकट करणें नीट नव्हे उभयतांनीं महाराजांस लिहावें, तेथून आज्ञा येईल त्याप्रमाणें चालावें, ऐसें ठरोन पत्रें लिहिलीं. यावरून महाराजांनीं पत्रें लिहिलीं जे,"तुम्हीं आपणांतच कलह वाढविला ही गोष्ट चांगली केली नाहीं. उभयतांही हुजूर यावें. उभयतांचीं बोलणीं ऐकून घेऊन प्रांत व हद्द नेमून देऊन त्याप्रमाणें हद्दीनें प्रांत व खंडण्या घेत जाव्या." यावरून प्रधान पंत निघोन आले. सदाशिव चिमणाजी घरीं होते त्यांणीं वासुदेव जोशी व रघुनाथ हरी प्रभु आंगरे यांचे पदरीं बहुत शहाणे कर्ते होते ते संभाजी आंगरे यांचे व तुळाजी आंगरे यांचें न बने म्हणोन कैदेंत ठेविले होते, त्यांस सोडवून आपणापाशीं आणिलें. आणि जोशी व रघुनाथ हरी कारभारी हातीं घेऊन सर्व दौलतीचें काम चालविलें. महाराजांचे दर्शनास गेले तेव्हां शहाणे कर्ते आहेत पाहून महाराजांनीं चिमणाजी आपा यांजकडे सरदारी होती त्याचीं वस्त्रें बहुमान यांस दिल्हा. आणि आपणापाशीं ठेविलें.

बाळाजी बाजीराव स्वारी करून पुण्यास येऊन महाराजांचे दर्शनास आले. महाराज पुढें सामोरे जाऊन बहुमान करून सन्मान केला. रघोजी भोंसले यांस पत्रें गेलीं. तेही येऊन पावले. त्यांस पुढें सामोरे जाऊन बहुमान करून सन्मान केला. आणि उभयतांचीं बोलणीं समजोन घेऊन तहनामा ठरावून दिल्हा जे, " सुभा माळवा, अजमेर, अगरा, प्रयाग व अंतरवेदी देखील खेरीज अयोध्या व मोंगलाईंतील मंगळवेढें येथील हे स्वारी अंमल प्रधान पंत यांजकडे असावा. स्वराज्य अम्मल निम्मे भोंसले यांजकडे असावा. पट्टण येथील बारा लक्षांचा अम्मल प्रधान यांजकडे देऊन बाकी अम्मल सेना साहेब सुभा यांणीं घ्यावा. आणि नर्मदा दक्षिण तीर या हद्दीनें एकंदर भोंसले यांणीं घ्यावें. नर्मदा तीर उत्तर प्रधानपंत यांजकडे. याप्रमाणें हद्दीनें रहावें. यांत कोणीं कोणाशीं खटला करूं नये. [ याप्रमाणें ] तहनामे ठरवून दिल्हे, आणि त्या प्रांतीं सरकारांत पेशकशी घेण्याचे ठराव करून दिल्हे. आणि उभयतांचें सख्य करून देऊन एकमेकांस मेजवान्या करविल्या. उभयतांनीं विकल्प ठेवूं नये, या उपरि कलह करूं नये, ऐसे पायांवर हात ठेवून घेतले. सरकारांत उभयतांनीं मेजवान्या केल्या. ठरावाचे ऐवज दिल्हे. आणि महाराजांनीं उभयतांस मेजवानी बहुमान देऊन निरोप दिल्हा. ते निघून गेले.

जिवाजी खंडेराव चिटणीस यांस महाराजांनीं आज्ञा केली कीं, "अंजनवेल गोंवळकोट हे जागे हबशी यांजकडे राहिले. तेथून कोंकण प्रांतीं उपद्रव

लागतो. त्यास तुमचे वडील खंडो बल्लाळ यांणीं मोठीं मोठीं कामें केलीं. मुत्सद्दीगिरी व दरखाचें काम करून शिपायगिरीही केली. तुम्हीं जाऊन बराबर लोक व फौज सामान घेऊन गोवळकोट घ्यावा सांगितलें. त्यांणीं शिबंदी नवी ठेवणें व सरकारी सामान काय देणें ते आज्ञा व्हावी त्याप्रमाणें जाऊन करितों, विनंति केली. यावरून आंगरे यांस पत्रें दिलीं. दारुगोळा तोफा व तरांडी देऊन कुमक करावी. कोंकणे लोक व हेटकरी यांचे सरदार लोक सुद्धां नेमिले. व नवीन येतील ते ठेवणें सांगितलें. फत्तेसिंगबावा यांजकडील स्वार फौजेचे सरदार नेमून दिल्हे. ते निघून गेले. किल्ल्यानजीक त्यांचा प्रांत मारून मोर्चेबंदी केली. हु ळ दी चे पाणियावरून मारागिरी तोफ लावून बहुत केली. किल्लेदार यांणींही मोर्चे मारणें व मारामारीची शर्त [ होती ] तितकी केली. यावरून महाराजांस विनंति लिहिली जे, " आणखी कांहीं हशम लोक हेटकरी लोक रवाना व्हावे. यावरून महाराजांनीं रवाना केले. व खर्चास खजीना पाठविला. हबशी यांणीं लोक देऊन सरदार किल्ल्याचे कुमकेस पाठविले. ते चालून आले. त्यांशीं लढाई देऊन मागें घालविले. आणि बहुत कजाखी करून किल्ला जेर केला. निशाण चढवून किल्ला घेतला. आणि वर्तमान महाराजांस लिहिलें. महाराज संतोष पावून किल्ल्यास हवालदार व दरखदार नेमून पाठविले. आणि हुजूर येण्याविशीं लिहिलें. आज्ञेप्रमाणें किल्ल्याचा बंदोबस्त करून दर्शनास आले. महाराजांनीं नवाजीस[८५] करून वस्त्रें जवाहीर बक्षीस इनाम गांव दिला.

बाबूजी नाईक जोशी[८६] हे राज्यांतील पुरातन सेवक व सावकारही मातबर होते. प्रधान पंत यांचे आप्तविषयी त्यांचें व यांचें न बने यास्तव सेनापति यांजकडे कारभार कांहीं दिवस महाराजांनीं सांगितला. तेथेंही बनलें नाहीं म्हणून हुजूर राहिले. त्यास त्रिचनापल्ली घोरपडे यांजकडे फत्तेसिंग बावा यांणीं सुभा सांगितला होता. पुनः मोंगल यांणीं फितूर करून घेतला. तो मसलत करून पुनः घ्यावा म्हणून कर्नाटक प्रांतींचा सरसुभा सांगून फौजेचा खर्च व फौज नेमून दिल्ही. त्यांणीं कर्नाटक प्रांतीचे महाल वगैरे नेमून सात लक्ष रुपये सरकारांत सालास देत जावे, बाकी खर्चवेंच संभाळावासें केलें. शिवाय खंडणीचे ऐवज येतील ते सरकारांत देत जावे. ऐसें ठरविलें. ते जाऊन अंमल बसवून खंडण्या उगवल्या त्या घेऊन आले. [ पुढें[८७] ] विरूबाईस[८८] शरीरीं पीडा झाली. ती वारली. शके १६६१. उभयतां राण्या त्यांचे आज्ञेत चालाव्या

८५. नवाजीस=स्तुति, तारीफ.

८६. यांचे बंधु आबाजी नाईक, यांस बाजीराव बल्लाळ यांची बहीण दिली होती.

८७. या बद्दल ' पुन्हा एक दोन वेळ ' इतकेंच मूळप्रतींत शब्द आहेत त्यांचा संबंध पुढील वाक्याशीं स्पष्ट होत नाहीं.

८८. विरूबाई—ही पूर्वी दासीपुत्री होती. परंतु हिजवर शाहूचें प्रेम विशेष बसल्यामुळें तिचा अधिकार इतर राण्यांपेक्षां ज्यास्त होता. मागें पृष्ठ ५ टीप २३ व १८ पहा.

ऐसें होतें. ती वारलियावरि थोरली धनीण[८९] यांची प्रकृति उग्र होती, ती महाराजांपासून सरंजाम व नेमणूक करून घेऊन वागूं लागली. धाकटी धनीण[९०] यांजकडेही सरंजाम नेमणूक केली. ती महाराजांचे आज्ञेत व मर्जीनें वागूं लागली. येसाजी भोंसले व कुसाजी भोंसले हे सरकारचे लेंकावळे यांस शिराळ वगैरे सुभा सांगितला. आणि पुढे बाबूजी नाईक यांजकडे कर्नाटक सुभा त्यांत त्रिचनापल्ली व श्रीरंगपट्टण हुजूर ठेविलें [ तें ] खेरीज करून आदवानी वगैरे सारे महाल कर्नाटकचे त्यांत निम्मे बाबूजी नाईक व येसाजी व कुसाजी भोंसले निम्मेंत, शिबंदी महाल मजकूर खर्च व निम्मे सरकार रसद मोकासा बाबती स्वराज्य अंमल त्याचे सात लक्ष रुपये रसद घेऊन भोंसले यांचे कारभारी यांणीं व तुम्हीं एक विचारें चालावें, ऐसें करून रवाना केले. बाबूजी नाईक कर्नाटक प्रांतीं गेले. तेथें संस्थानी यांशीं कटकट वाढून लढाई पडली. शिबंदी ठेवणें आली. लढाईंत मोड झाला. लुटले गेले. शिबंदीचा पेंच आंगावर आला. त्यांचीं धरणीं बसलीं. याजबरोबर निघोन सातारां आले. आणि महाराजांस विनंति केली जे "शिबंदी व कर्जाचा[९१] पेंच आला यांत अबरू व प्राण रहात नाहीं. यास्तव सरकारांतून पांच सात लक्ष रुपये देऊन पेंच वारावा." तेव्हां महाराजांनीं आज्ञा केली जे, "तुम्हीं करणें सरकार आज्ञेनें करावें. लेहून आज्ञा न्यावी. ज्या संस्थानी यांणीं फिमात केली त्यांचें पारपत्य करण्यास येथून फौज सरदार रवाना केले असते. तुम्हीं कर्ज व शिबंदी हुकुमाखेरीज कां वाढवली ? आणि संस्थानी यांणीं महाराजांचे सुभ्यास मोडलें हा बदनक्षा[९२] [ कां ] करून घेतला ? जाली ती गोष्ट बरी जाली. गवगवा जाला ते सावकार व शिबंदी आकारून समजावणें. त्याची तोड महालीं व खंडणीचे ऐवज येणें हिशेब पाहून दुसरा सुभा नेमून त्याजपासोन करवितां येईल. तोंपर्यंत गवगवा करतील त्यांस सरकारांतोन समजोन सांगोन गवगवा मोडतां येईल. सांगितलें असतां आंच[९३] सोसली नाहीं. ना मोहरम जालां." तेव्हां सुभ्याची घालमेल होती या विरश्रीस[९४] येऊन आग्रह करून हा पेंच महाराजांनीं वारावा बोलूं लागले. आणि अविचार करून सोमल घेऊन विषप्राळय केला. त्यांणीं अगदीं व्यापून बोलणें चालणें सर्व राहिलें. हे वर्तमान महाराजांस प्रातःकाळीं समजलें जे, नाइकांनीं विषप्राळय केला. तेव्हां महाराज बोलले जे, "नाईक पेंच वारितों सांगितलें असतां अविचार करून विष घेऊन आम्हांवर ब्रह्महत्या देणार त्यास या विषानें

---

८९. थोरली धनीण=सकवारबाई.

९०. धाकटी धनीण=सगुणाबाई.

९१. 'शिबंदी खर्चाचा' को० प्र०.

९२. बद-नक्षा=अपलौकिक. दुष्कीर्ति.

९३. आंच=तीव्रता.

९४. वीरश्री=ईर्ष्या. सुभा यांजकडून काढून सदाशिवराव भाऊ यांजकडे सांगण्याचा विचार होता.

कांहींएक बाधा होणार नाहीं. दूध पाजावें. " म्हणून आपला हात लावून दूध पाठविलें. दूध पाजिलें. त्याणें सोमल उतरला. शुद्धीवर आले. नंतर महाराज जाऊन बहुत विवेक सांगितला. आणि गवगवा जाला त्याचा बंदोबस्त करविला. त्या सोमलाचे योगें नाइकांस बहुत शक्ति व आहार चतुर्गुणी अधिक जाला. नित्य चार शेर दुधाची क्षीर भक्षावी. प्रातःकाळीं दूध घ्यावें. स्त्रिया अधिक असाव्या. ऐशी शरीरांत शक्ति बहुत जाली. कर्नाटक सुभा येशवंतराव पोतनीस यांजकडे सांगून रसद भरणा वगैरे करून नाइकांच्या पेंचाच्याही तोडी काढविल्या. शके १६६३.

बाळाजी बाजीराव पुण्यास होते. ते समयीं किलीजखानें नबाब निजामउल्मुल्क वारले. शके १६६९. त्यांचे थोरले पुत्र नासरजंग व दुसरे सलाबतजंग, तिसरे निजाम अल्लीखांन ऐसे होते. नासरजंग यांसि रामदासपंत कारभारी होते. मसलत करून अदवानीचे जागीर अंमलाचे सुभे हिदायत मोदीखांन होते ते बदलून राहिले, त्यांजवर कर्नाटक प्रांतीं गेले. त्यांची यांची मातबर लढाई चालली. उभयतांनीं हत्ती चालवून तिरंदाजी केली. पठाण लोक उभे राहून लढले. लोक बहुत पडले. त्यांत नासरजंग व हिदायत मोदीखान दोघेही सरदार रणांत पडले. सलाबतजंग यास या अंबारींत बसवून रामदासपंत यांणीं आणखी सर्व फौज सांवरून बहुत शिपायगिरी करून लढाई मारली. फत्ते पावले. सलाबतजंग सुभा जाले ते भागानगरीं येऊन दौलत चालवूं लागले.

दमाजी गायकवाड व उमाबाई, त्रिंबकराव दाभाडे बाजीराव यांणीं मारिले

---

१५. निजाम उल्मुल्क यांस पुत्र सहाः गाजुद्दीन, नाझरजंग, सलाबतजंग, निजामअल्ली, महमदशरीफ आणि मीर मोगल. यांतून पहिले दोन एका आईचे—बाकीच्यांच्या आया निरनिराळ्या होत्या. गाजूद्दीन हा दिल्लीस होता व त्यास अमीर उलूउमरा हा किताब होता.

१६. हिदायत मोद्दीनखां यासच मुजफरजंग असा किताब होता. ह्याच नांवानें तो इतिहासांत प्रसिद्ध आहे. हा निजामुल्मुल्क यांच्या मुलीचा मुलगा असून त्याजवर निजामाचें विशेष प्रेम होतें. आपल्या आजोबानें आपणास गादी दिली असें म्हणून हिदायत मोद्दीनखां हा चंदासाहेब व फरांशीस लोक यांचें साहाय्य घेऊन हैदराबादेकडे चाल करीत होता.

१७. बदलून=उलटून, फंद करून.

१८. प्रथम नाझरजंगाचा जय होऊन मुजफर यास त्यानें कैद केलें. पण नाझराच्या फौजेंत दुफळी होऊन तो मारला गेला—तेव्हां मुजफर यास मालक असें मानून फौजेनें हैदराबादेकडे चाल केली—इतक्यांत पुनः सरदार लोकांत कटकट वाढून मुजफरजंगही ठार मारला गेला. तेव्हां फ्रेंच सरदार बुसी हा बरोबर होताच, त्यानें सलाबतजंग यास पदारूढ करून हैदराबादेस नेलें. फ्रेंच लोक व कडापा, कर्नेळ व सावनूर येथील नबाब हे या कृत्यांत मुख्य होते. मारेकऱ्यांचें काम नबाब यांणीं पतकरिलें होतें. नाझरजंगाचे पक्षास रघुजी भोंसले व इंग्रज लोक हे सामील होते.

असतां त्यांचें कांहीं जालें नाहीं म्हणून चुरस मनांत धरून महाराजांशीं दुरोखे जाले. व फौज धरून बाळाजी बाजीराव प्रधान यांजशीं कटकट वाढवून लढाई केली. त्यांत मोड जाला. दमाजी गायकवाड यांस धरून बेडी घातली. येशवंतराव दाभाडे व्यसनी बेहोष जाले. गुजराथ व सुरत अठ्ठाविशींतील सरकारी अंमल उगवावा म्हणून महाराजांनीं प्रधान पंत यांस आज्ञा केली. त्यांणीं शिंदे होळकर सरदार व रघुनाथ बाजीराव फौज रवाना केली. ते समयीं गायकवाड कैदेंत होते. त्यांणीं बोलणें लाविलें जे, "या उपरि आपण सरकाराशीं विरुद्ध न वागतां सेवा करून दाखवितों. सरकारी फौजे बरोबर जाऊन निष्ठेनें सेवा करून दाखवितों." यावरून सोडून सांत लक्ष रुपये नजर ठराव केला. त्याचा हवाला जिवाजी खंडेराव चिटणीस यांणीं घेतला. त्यांजपाशीं आपले बंधु गोविंदराव गायकवाड व फत्तेसिंग ऐसे बोलीस त्यांचे घरीं ठेवून भरणा केला. आणि रघुनाथ बाजीराव यांजबराबर दिल्हे. त्यांनीं सर्व सुरत अठ्ठाविशी अंमल बसविला. सुरतेंत मोंगल यांजकडे जकात व मामला व स्वराज्य अंमल येत नव्हता तो महाराजांनीं घ्यावा सांगितलें तो बसविला. रायगड किल्ला औरंगजेब यांनीं घेऊन हबसी यांजकडे सुभा दिल्हा ते समयीं सुरतेवर खर्चाची नेमणूक लाख रुपये नेमून दिल्हे [ होते ] ते लाख रुपये स्वराज्य अंमल खेरीज करून देत जावे ऐसें करून महाल तोडून घेतले. आणि कच्छभूज व काठेवाड द्वारकेपर्यंत स्वारी करून खंडण्या घेऊन बहुत खजीना घेऊन महाराजांपाशीं येऊन सर्व निवेदन केलें. लढाई पडली तेथें शिपायागिरी केली. महाराजांनीं तारीफ करून बहुमान दिल्हा.

जिवाजी खंडेराव चिटणीस शरीरीं पीडा होऊन वारले. शके १६६४ दुंदुभिनामसंवत्सरे पौष वद्य सप्तमी. रामराव जिवाजी व देवराव जिवाजी दोन पुत्र त्यांस होते. व भाऊ बापूजी खंडेराव व गोविंद खंडेराव व बहिरव खंडेराव [ ऐसे ] होते. त्यास रामराव सात वर्षांचे लहान होते. त्यांस महाराजांनीं नेऊन वस्त्रें बहुमान कलमदान यथापद्धति दिल्हें. आणि बापूजी खंडेराव यांजकडे सरदारी, ते शिपाई चांगले म्हणून, दिल्ही. त्यांणीं शिकारींत स्वारींत नेहमीं हजार रुपये स्वारांचा शेरा ऐसा करून मातबर स्वार पालखीनिशीं ऐसे साठ स्वार, शिवाय आणखी स्वार व त्यांची घरपागा ऐसें रहावें, ऐसें

---

९९. दुरोख=दुटप्पी, दुलग.

१००. 'पांच लक्ष' कोलापूर प्रत.

१. ताराबाई व दमाजी यांणीं पेशव्यां विरुद्ध मसलत केली ती त्यांणीं दमाजीस धरून मोडून टाकिली व गुजराथेंत अर्धा अंमल बसवून अमदाबाद घेतली, ह्या गोष्टी शाहू महाराज निवर्तल्यावर सन इसवी १७५२।५३ सालीं झाल्या. पुढें टीप ४ पहा.

२. मिती कोल्हापूर प्रत देत नाहीं.

करून दिल्हें. गोविंद खंडेराव मुत्सद्दीगिरींत व लिहिण्यांत खबरदार त्यांणीं चिटणीस लहान यांचे चालवावेंसें केलें. व जामदारखाना याचा दरोगा असामी करून दिल्ही होती. दावलजी सोमवंशी सरलष्कर वारले. त्रिंबकराव सोमवंशी यांसि सरलष्कर पद बहुमान दिल्हा. तेही लवकरच वारले. नंतर आपाजी सोमवंशी यांस पद दिल्हें.

महाराजांचा पुण्यप्रताप [ विशेष ] सातारियास तख्त करून राहिले ते दिवसापासोन राज्यकारभार सेवक लोकांपासोन [ चालविला. ] मोठ्या मसलती व युद्धप्रसंग फौजा पाठवून [ केले. ] मनसब्यांत बहुतच चतुर [ होते ] औरंगजेबासारखे शत्रु यांणीं सर्व दौलत घेतली. संभाजी राजे धरून नेऊन मारले. राजाराम साहेब यांणीं बहुत प्रताप करून चंदीस जाऊन राज्य केलें. तेथून सरदार व मोठीं माणसें वाढवून लढाया करविल्या. पुनः देशीं आले. कांहीं राज्य सोडवावें, तों लवकरच वारले. ते समयीं पादशहाचे कैदेंत असतां पादशहा वारले. उदयकाळ प्राप्त होऊन त्यांचे पुत्र शाहाजादे यांणीं आपले आपण राज्यावरि लावून दिल्हें. ते येऊन आईसाहेब[३] व त्यांचे पुत्र यांणीं राज्य आपणच करावें ऐशी बुद्धि धरिली, त्यांचा बंदोबस्त करून त्यांस खर्चाचा तह करून, मोंगलाईंत सर्व राज्य गेलें [ होतें ] ते प्रांत व किल्ले, कोट, स्थळें सोडवून, राज्याचे धारे थोरले शिवाजी राजे यांप्रमाणें सावधता मसलतीनें [ घालून ] सर्व लोक आज्ञेंत वागवून, नवीन मोठीं माणसें निर्माण केलीं, वाढविलीं. जुनीं माणसें अनुकूळ जालीं त्यांचीं पदें व त्यांस सन्मान सरंजाम इनाम देऊन चालविलें. जीं चांगलीं माणसें व पोख्त शहाणे यांचे मसलतीनें चालावें, विश्वासू सेवक लोक यांजवर विश्वास ठेवून सर्व कार्यें त्यांचे हातें घ्यावीं, [ ऐसे करून ] लघु मनुष्य अथवा दुर्व्यसनी, कैफी, दारूबाज यांस समीप न ठेवितां मुत्सद्दी लोक प्रधान, प्रतिनिधि व सेनापति आदिकरून अष्टप्रधान व दरखदार यांचे हातें कारभार व सुभे सांगून चालविले. मराठे लोक शिपाई शूर यांस ज्यांणीं जशी सेवा केली तसा त्यांस सरंजाम देऊन शिपाईगिरीचे कामांत ठेविले. महाराजांस पुत्रसंतान नाहीं. याजविशीं अनुष्ठानें व धर्म करविले. पुत्र जाले ते दोन तीन वर्षांचे होऊन वारले. याजमुळें [महाराजांची] उदास वृत्ति जाली. शिकारींतच अरण्यांत बहुत काळ घालवावा ऐसें जालें. उत्तरदेश अटकेपर्यंत[४] सोडवून थोरले महाराजांचा संकल्प सिद्धीस नेहला. देश रामेश्वरपर्यंत सोडवून संस्थानी यांसच स्थापून खंडणी घ्यावी ऐसें केलें. पश्चिम [ दिशेस ] द्वारकेपर्यंत

३. आई साहेब=ताराबाई.

४. साक्षात् अटकेपर्यंत मराठे १७५७ १७४५८ सालीं गेले. पुढील गोष्टी राजगौरवाकरितां ग्रंथकारानें जरा आलीकडे ओढिल्या आहेत. पुढें गुजराथ, रामेश्वर या संबंधानेंही हेंच म्हणणें लागू पडेल.

अंमल व खंडणी यावी ऐसें केलें. पूर्व देश कटक, जगंनाथ, वराड, गोंडवण, बंगालपर्यंत अंमल खंडणी यावीसें केलें. ऐशा चतुःसमुद्र मर्यादा [होऊन] चहूं दिशेचें राज्य एक आज्ञा चालवूं लागले. त्यांत उत्तर दिशेचें आधिपत्य फौजा जाऊन बंदोबस्त राखणें, खंडणी पैका आणून आज्ञेत चालावें ऐसें करून प्रधान पंत यांजकडे सांगितलें. पश्चिमदेश गुजराथ, काठेवाड द्वारकापर्यंत सुभा सेनापति दाभाडे व गायकवाड यांजकडे नेमून दिल्हा. पूर्वदेश सेनासाहेब सुभा यांजकडे वराड, गोंडवण, बंगाला, जगन्नाथ पर्यंत सुभा सांगितला. दक्षिणदेश हुजूर ठेवून फौज सरदार व सुभे पाठवून बंदोबस्त कर्नाटक त्रिचनापल्ली, रामेश्वरपर्यंत खंडण्या हुजूर आणविल्या. सरलष्कर यांजकडे मध्य गंगातीर बालाघांटपर्यंत सुभा दिल्हा. वरकड प्रधान व मुत्सद्दी व सरदार यांजकडे तालुके व सरंजाम नेमून देऊन रसद यावी व फौजेची नेमणूक चाकरी सरंजामी यांणीं करावी ऐसें केलें. त्याप्रमाणें सर्व अष्टप्रधान व सरंजामी व सरदार काडीमात्र आज्ञेचें उल्लंघन न करितां चालूं लागले. याजमुळें दिवसेंदिवस सर्वांस जें कार्य सांगितलें त्यांणीं यश मिळवावें, कार्यसिद्धिच करावी, ऐसें होऊं लागलें. दिल्लीचे पादशहापाशीं हिंगणे वकील ठेविले [ होते ] त्यांणीं सर्व कारभार करून वजीर व सुभे ज्यांस ठेवा, दूर करा, सांगितलें तसें वर्तावें. वकिलांनीं सर्व कारभार करावा. पादशाई खर्च व इतमाम व त्यांचे सरदार व पादशाईंतील मातबर व लहान यांचे सर्वांचे जागिरी व सरंजाम व इतमाम चालावे. उच्छेद कोणा एकाचा होऊं नये. पादशाहींतील मातबर सुभे स्वदेशीं त्यांचे तह चालून ते जरी पेचांत आले तत्रापि त्यांचें सर्व हरण न करितां त्यांचे अंमल त्यांजकडे चालावे, सर्व संस्थानें मांडलिक राजे यांणीं खंडणी कारभार [ करून ] त्यांची दौलत इतमाम चालून खंडणी यावी, ऐसें करून दिल्हें. याप्रमाणें अष्टप्रधान व सर्व सरदार यांणीं ज्यांनीं ज्यांनीं पराक्रम जसे केले त्याप्रमाणें त्यांजकडे सुभे व तालुके कोटंद्यावधि रुपयांचे सांगून सरदार यांस फौज ⁵तसलमातीस देऊन वाढविलें. सर्व पृथ्वींतील चातुर्य कलावंत व कुशल लोक शहाणे मर्द ऐसे माणूस पुणें व सातारा येथें येऊन राहिले. मोठीं माणसें शिपाई व कारकून व मुत्सद्दी ऐसे लक्षावधि जमा करून मोठे मोठे सुभे चार पांच केले. त्यांत त्यांचें चालावें ऐसें करून देऊन कांहीं आपणापाशीं ठेवणें [ ते ] ठेविले. श्रावणमासींचा धर्म दाभाडे त्रिंबकराव लढाईंत पडले यापासोन प्रधान पंत यांणीं कीर्द राजमंडळ, स्वारी प्रधान, ऐसें म्हणोन त्यांत ब्राह्मण यांची वेद व शास्त्र यांत परीक्षा करून यथायोग्य शतावधि हजारों रुपये नेमून द्यावे, याप्रमाणें चार लक्ष पांच लक्ष धर्म पुणें येथें त्यांचे निसबतीस नेमून देऊन घडावा, करावा, ऐशी आज्ञा

---

५. तसलमात=दिमत, स्वाधिनता.

करून करविलें. ते कीर्ति सर्व दिगांत जाऊन थोर विद्वान्, व तपस्वी, व महापुरुष ऐसे ब्राह्मण चहूं दिशेचे लक्षावधि येऊं लागले. विद्यापीठच जालें. जशी काशी तसें सातारा पुणें जालें. धर्मस्थापना, तीर्थ क्षेत्र, देवब्राह्मण, सत्पुरुषांचीं स्थानें, आग्रहार, पूजा, नैवेद्य, व गांवोगांवच्या देवतांचे नंदादीप, पूजा, नैवेद्य चालावे ऐसा बंदोबस्त करून हुजुरून दिल्हे व अष्टप्रधान यांणीं धर्मादाय इनाम देवब्राह्मण यांस दिल्हे त्यांस राजपत्रें करून देऊन चालविले. याप्रमाणें सर्व पृथ्वींत आज्ञा कोण्हीएक उल्लंघन न करावी. ऐसें सार्वभौम राज्य केलें. व नीति व न्यायें करून प्रजेचें पालन केलें, व पोषण केलें. कोण्हा एकास दुःख नाहीं. गरीब अनाथ यांचे ठायीं बहुत दया करून त्यांचें दुःख परिहार करावें. रयतेस उपद्रव काडीमात्र नाहीं. बिघा व पैका नेम केला त्याहून जाजती तिळप्राय उपद्रव होऊं नये ऐसें केलें. त्या योगे करून साम्राज्य व सर्वांस बरकत, पृथ्वीचे ठायीं परजन्यवृष्टि ⁶कालें करून व्हावी, पृथ्वीनें धान्य पीक बहुत द्यावें, ऐसें सुभिक्ष जालें.

कोणे एके समयीं आपले सेवक लोक लक्षावधि फौजेंत धणी केले, कोटयावधि द्रव्य दौलतदार केले, ते सर्व सुखी व संपन्न जाले याचा संतोष बहुत, परंतु आज्ञेंत वर्ततात कीं नाहीं हें पहावें म्हणून बाळाजीपंत प्रधान यांस दहा हजार फौजेनीं हुजूर भेटीस यावें म्हणून लेहून आणविलें. ते फौज घेऊन आले. हें कळतांच प्रधान इतकी फौज घेऊन कां येतात बोलले. हे बातमी त्यांस कळलियावरून तेथेंच दहा कोसांवर फौज लोक टाकून पांच खिजमतगार घोडीं ऐसें निघोन पुढें आले. तो मुहूर्त भेटीचा सांगून त्यांणीं पाठविला. ते समयीं महाराजांस कळोन शिकारीस गेले. माशास गळ टाकून बसले. हें कळोन प्रधान पंत तेथेंच गेले. पाठीमागें उभे राहिले. चोपदार यांणीं मुजरा दिला. एक प्रहरपर्यंत त्यांजकडे पाहिलें नाहीं. शिकारीचेंच पुढें बोलणें, हव्यास करणें, चालविलें. नंतर मागें फिरोन पाहिलें. त्यांणीं नजर करून मुजरे केले. विडे देऊन डेऱ्यास जाऊन उतरावें, आज्ञा केली. प्रधान पंत दरबारास आले. तेव्हां महाराज ⁷चरण घालून तख्तावरोन उठोन वाड्यांत चालले. मध्यघरचे दरवाज्यांत गेले तेथें चरण टाकिले. खिजमतगार दूर होते. महाराज पुढें गेले तों चरण बाळाजीपंत यांणीं घेऊन मागील दिवाणखान्यांत घेऊन गेले. आणि पुढें ठेविले. याजवरून संतोषी होऊन कृपा करून कामेंकाजें उलगडून देऊन निरोप दिल्हा.

कोणे एके दिवशीं पांच सात हजार फौजेनिशीं मोहीम करून मोठे इतमामानें प्रधानपंत आले. भेटी जाल्या. डेऱ्यास फौजेंत राहिले. तेव्हां अकस्मात् चिटणीस यांस बोलावून आज्ञा केली कीं, "प्रधान यांस चिट्टी लिहावी जे,

---

६. कालेंकरून=यथाकालीं. | ७. चरण=खडावा किंवा पैजारा.

तुमचें प्रधानपद दूर केलें आहे. तरि शिक्के कटार व जरीपटका हुजरे पाठविले यांजबराबर जामदारखान्यांत दाखल करणें. " म्हणून चिट्टी लिहून दोन हजरे बोलावून चिट्टी लष्करांत बेण्येवरि होते तेथें रवाना केली. तों प्रधानपंत स्नानास बसले होते, तेथें हुजरे जाऊन चिट्टी दिली. वाचून पहातां चिट्टीस मुजरे करून स्नान न करितां तसेच उठोन शिक्के कटार व जरीपटका हुजरे यांचे स्वाधीन करून रवाना केले. आणि एक राहुटी लष्करापासून दूर बाहेर देवविली तेथें स्वयंपाक करविला. खासगत शागिर्दपेषा चाळीस पन्नास माणूस मात्र घेऊन सरकारी सर्व इतमाम फौज तेथें ठेवून राहुटीस जाऊन राहिले. आणि चिट्टी लिहिली जे, " आज्ञा आली तेव्हांच पायांपाशीं येऊन पावावें परंतु सरकारी कारखाना सर्व व फौज आहे ते कोण्हाचे स्वाधीन करावी ते आज्ञा यावी. [ म्हणजे ] त्यांचे स्वाधीन करून नंतर पायांपाशीं येतों, " लिहिलें. आणि हुजरे यांस सांगितलें जे, " कारखाने व लोक सैलतनत सरकारची आहे हे कोण्हाचे जिम्मेस करून पायांपाशीं यावें ते कारकून नेमून यावे त्याचे स्वाधीन करून हुजूर येतों, किंवा तसेंच यावें ते आज्ञा यावी. म्हणजे निघोन येतों, " सांगून पाठविलें. हुजरे शिक्के व जरीपटका घेऊन महाराजांपाशीं आले. त्यांस जामदारखान्यांत नेऊन गुदरावें, सांगितलें आणि " सलतनत सरकारांत घेण्यास कारकून येतील तोंपर्यंत तुम्हीं आहां तेथेंच रहाणें " सांगून पाठविलें. याजप्रमाणें आठ दहा दिवस गुजरले. बहुत मुत्सद्दी लोक व जवळचे कृपेंतील रहाणार [ यांणीं व ] देहुडी कडून [ अशी ] सर्वांनीं विनंति केली जे, " प्रधान यांजपासोन असा अपराध काय जाला आहे ! " त्यांजपाशीं उत्तरें जालीं जे, " प्रधानपद [ यांजकडे ] ठेवावयाचें नाहीं. पुन्हा पिंगळे यांचें पद त्यांस द्यावयाचें आहे. " तेव्हां सर्व मुत्सद्दी यांणीं विनंति केली जे, " हिंदुस्थान प्रांतीं वगैरे हे बातमी गेली व जाईल. तालुके व फौज सरदार चहूंकडे यांचे विद्यमानचे आहेत त्यांत बखेडे होतील, मारले जातील. यास्तव त्यांजवर कृपा करणें. किंवा दुसरियास पद सांगून आधीं बंदोबस्त व्हावा. " [ ऐशी ] विनंति केली. बाळाजीपंत प्रधान यांणीं चिटणीस व मंत्री याजपासोन विनंति करविली कीं, " आम्ही एक राहुटीनें बाहेर राहिलों. चरणापाशीं येण्याविशीं आज्ञा व्हावी. किंवा दुसरी सेवा कांहीं सांगावी किंवा कृपा होणें ती व्हावी. " तेव्हां उत्तर जालें जे, नजर काय देतात बोलावें. याजवरून सांगून पाठविलें जे, " आम्ही एकटे येथें आहों. सलतनत सरकारची सरकारांत आली. आम्ही येथेंच पायांपाशीं आहों घर व सर्व जें आहे तें सरकारांत नजर आहे. आणवावें. " याजवर पद दुसरेकडे सांगावयाचें, इतकेंच उत्तर केलें.

---

८. सलतनत=फौजफांटा, चतुरंग दळ. | ९. देहुडी कडून=राण्यांकडून.

यानंतर एके दिवशीं अकस्मात् हुजरे बोलावणें पाठविले. बाळाजीपंत एकच खिजमतगारानिशीं येऊन मुजरे करून उभे राहिले. " अपराधी सर्वस्वें आहें. पायांपाशीं कोणती सेवा सांगणें ती आज्ञा होऊन पायांचा वियोग मात्र न व्हावा, " विनंति केली. याजवरून बहुत कृपावंत होऊन एकनिष्ठ सेवक खरे, याजपासोन कदापि अंतर पडावयाचें नाहीं, म्हणोन जरीपटका व शिक्के व वस्त्रें जवाहीर सर्व पदाचे बहुमान आणवून वस्त्रें व प्रधानपद पुन्हा दिल्हें. यांणीं पायांवर मस्तक ठेविलें. तेव्हां " तुमची निष्ठा कशी आहे [ हें पाहिलें. ] बाजीरावाचे पुत्र, बाळाजी विश्वनाथ यांचे नातु खरे ! तुमची सेवा व निष्ठा पाहून बहुत संतोषित जालों, " बोलले. आणि आंगावरील पोषाक जवाहीर वगैरे आणवून आणखीं दिल्हें.

याप्रमाणें सर्व अष्टप्रधान यांत मुख्य फौजेचे व तालुक्याचे मोठे अधिकारी प्रधान व सेनापति व सेनासाहेब सुभा त्यांत प्रधान यांची परीक्षा अशी केली. कान्होजी भोंसले [ यांचें ] सेनासाहेब पद दूर करून रघोजी बावांस दिल्हें. ते हुजूर ठेविले तसे राहिले. सेनापति [ ही ] आज्ञेत चालावे [ असें केलें. ] पदें दूर केलीं, किंवा नजर ठराविली, मुलकाच्या घालमेली केल्या, असतां कोण्हीएक फंद किंवा आज्ञा उल्लंघन न करितां चालले. याप्रमाणें मोठे धारेनीं व मनसब्यांनीं राज्य बहुत दिवस महाराजांनीं अकुंठित आज्ञा चालवून केलें.

विरूबाई निवर्तली याउपरि उभयतां राण्या यांजकडे सरंजाम नेमणुका अधिक वाढविल्या. बंदोबस्त नीट करून[10] दिल्हे. परंतु थोरली धणीन [ यांची ] मर्जी बहुत नाजूक याजमुळें आग्रह करणें पडूं लागलें. एकीकडे दिलें तें दुसरीकडे पाहिजे ऐसे आग्रह पडले. धाकटी राणी धणीन सरकार मर्जी व लक्ष्य धरून चालावें ऐशी मर्जीत राहिली. गांवांतील शहरांतील मनसुबी व फिर्यादी याच्या हिमायती[11] पडूं लागल्या. गांव खंडणी अंमल पाहिजे तेथें पाठवावा. व वतनें विकत घ्यावीं ऐसें होऊं लागलें. यावरून महाराज बहुत उदास [ झाले. ] प्रधानपंत यांस आणवून दोहींकडे[12] गांव नेमणूक करून खर्च पाहून करून देऊन शहरांत फिर्याद किंवा वतन घेणें अंमल पाठवणें कांहीं एक कारभार देहुडियांकडून होऊं नये, कोण्हाची हिमायत मनसुबी करूं नये, ऐशी यादी प्रधान यांजपासोन लिहून, आपले खास दस्तुर करून, निक्षून दोहींकडे ताकीद केली. तें मान्य दोहींकडे केरविलें. एक दिवस एक महाल[13] यांत भोजन एक दिवस एकीकडे ऐसें केलें. आणि नाटकशाळा मराठ्या मुली पाहून विकत

१०. मागें पृष्ठ ८० टीप ८९ पहा.

११. हिमायती=आश्रय, भीड.

१२. दोहींपैकीं सकवारबाई ही फार खबरदार बाई होती. आपल्या हातीं सर्व कारभार यावा असें तिच्या मनांत फार होतें.

१३. एक महाल=एका राणीचा महाल.

व नजर आणून ठेवून कारखाना वाढविला. त्यांत चौकीदार व खोजे वगैरे नेमून मोंगलाई पद्धतीनें चालविलें. आपण बहुतकरून शिकारींत एक दोन दिवस रहावें. सर्वकाळ शिकारींतच काढावा. संतान पुत्रही जाले नाहीं. जाले तेंही गेलें. यावरून उदास वृत्ति जाली. सरकारी ऐवज, नेमणुका, तालुकदार यांजकडील व हुजूर महालचा येऊन खर्चास ज्यास्त होऊन कर्जाऊ ऐवज होईल तो दोन तीन वर्षी सर्व तालुकदार आणून त्यांजवर हिसेरसी बसवून कर्ज वारीत जावें विनंति केली[१४]. त्याप्रमाणें बंदोबस्त चालविला. गोविंदराव चिटणीस व देवराव राजाज्ञेचे मुतालीक, येशवंतराव महादेव पोतनीस यांणीं सर्व कारभार खर्चवेंच सरकारविल्हे हुजूरविल्हेकडे ऐवज जावा त्याचा आपले दरखाप्रमाणें यशवंतराव व देवराव [ या ] दोघांनीं करावा. राजकारण कारभार सर्व गोविंदराव यांजकडे ठेवून त्यांणीं करावा. आपण बहुतकरून शिकारींत व बाहेर जनाना नाटकशाळा यांत असोन वरचेवरी कागदपत्र पाहून व आपले हातें खास दस्तक करून बहुत सावधपणें हुकुमांत [ सेवकांनीं ] चालावें, आज्ञेशिवाय कांहींएक होऊं नये, ऐसें चालविलें.

जानराव निंबाळकर खर्डेकर भेटीस आले. यावरून महाराजांस हुजरे, यांणीं पागोटें जलदी करून आणून देऊन, " जवळ आले, भेटीस पुढें जाणें मोंगलाईतील सरदार बहुत इतमाम व जवाहीर पोषाक ऐसे आले आहेत," विनंति केली. तेव्हां " आमचे भेटीस येणार किंवा पागोटयास ? " बोलले. आणि खंडया म्हणून कुत्रा बहुत नामी शिकारींत होता, त्यास महाराजांनीं पालखी व इतमाम पांच हजार रुपये नेमणूक माणसें वगैरे चालविलें होतें, त्यास जवाहीर भरजरी झूल वगैरे घालविलें. पोषाक मोठे व अळंकार कंठ्या चौकडे खिजमतगार यांस देवविलीं आणि भेटी समयीं आपण कांहीं एक पोषाक पागोटें जवाहीर न घालितां विजार घालावी, अगर पैठणी अगर ताडपत्री पासोडी असावी, ते घेऊन भेटी जाल्या. निंबाळकर बहुत खजील जहाले. त्यांस सन्मान वस्त्रें मेजवानी करून निरोप दिल्हा. महाराज नेहमीं याप्रमाणें स्वारी शिकारी [ करीत ] पागोटें न घालितां राहूं लागले. केश मस्तकाचे बहुत चांगले तेच मोकळे असावे. तेच शोभायमान ऐसे जाले. दसऱ्याचे दिवशीं मात्र पागोटें घालावें, ऐसें जालें. शिकारीस सर्व काळ जाणें ते कारभारी यांणीं आधीं अगर [ ? ] येऊन सर्व समजावून करावा. फारच निकड असेल तर प्रधान व कारभारी यांणीं शिकारींत समजावून तेथें आज्ञा घ्यावी. ऐसें होऊं लागलें. सर्व काळ बहुतकरून अरण्यांतच असावें ऐसें जालें. याप्रमाणें पांच सहा वर्षे उदासवृत्ति जाली.

---

१४. अशी विनंति कोणी केली ? चिटणिसांनीं ? कोल्हापूर प्रतींत " सर्व तालुकदार आणून त्यांवर हिसेरसी बसवून कर्ज वारीत जावें " असें आहे.

नाटकशाळा वगैरे जनाना रहाणें बहुत गुप्तरूपें मर्यादेनें त्यांत लखमोजी व बसवंतराव खोजे म्हणून त्यांजवर विश्वास ते त्या कामांत तैनात सरंजाम देऊन वाढविले. सर्व सेवक लोक कोण्ही कोणाची अमर्यादा न करितां चालावें. लहानांनीं थोरांनीं अमर्यादा केली असतां शिक्षा करावी ऐसें केलें.

[ पुढें ] संतानवृद्धि जाली नाहीं. [ म्हणून ] लग्नसमारंभ मोठा करावा असें मनांत यावरून लग्न करावें ऐसें मनांत येऊन गैंजराबाई यांचे लग्नाचा निश्चय समारंभ बहुत तरतूद दहा लक्ष रुपये खर्चावेसें करून मंडप बादली व साहित्य कारखाने तरतूद जाबते करून सर्व अष्टप्रधान व सरदार नामी संस्थानी व मांडलिक राजे बोलावून सर्वांस येतील त्यांच्या साहित्यास व पदरचे व नगरचे लोक सर्वांस साहित्य जे ज्यास पदार्थ पाहिजेत तैसे पावावे ऐसें समारंभ करून केलें. पुण्याहवाचनादि सभा करून उभयतां राण्या दोहींकडे बसवून आपण केलें. ते समयीं जरी मंडपास मोतियांचे घोंस असावे. अष्टप्रधान व सर्व मातबर सरदार सर्वही संपन्न लक्षावधीचे जवाहीर व पोषाक आंगावर ऐसे मुत्सद्दी व सरदार पांच सातशें शिवाय आणखी मातबर लोक मंडपांत मजालस जाली, तें केवळ इंद्रभुवनाहूनही अधिक ! गुणिजन दहा हजार वीस हजार रुपये देऊन आणविले. व वाद्यें फारच [ आणविलीं. ] ते समयीं अद्वितीय समारंभ जाला. ऐसें लग्न केलें.

संभाजी महाराज ही तिसरोन सातारां कुटुंबसुद्धां श्रीदेवास जाऊन इहिदे अर्बैनांतें आले. त्यास समारंभ व सत्कार बहुत करून मेजवान्या वगैरे महिनाभर ठेवून केले. खर्चास दिल्हें. चार कोस पालीपर्यंत पोहोंचवण्यास गेले. हत्ती, घोडे, जवाहीर, वस्त्रें देऊन रवाना केले.

श्रीपतराव प्रतिनिधि शरीरीं पीडा होऊन वारले. शके १६६८ क्षयनामसंवत्सरे. त्यांचे धाकटे बंधु जगजीवन परशुराम यांस प्रतिनिधिपद वस्त्रें बहुमान देऊन दिल्हे. यमाजी शिवदेव यांस मुतालकीचीं वस्त्रें दिल्हीं.

मदारी म्हणून हत्ती होता. बहुत चांगला होता. सर्वकाळ मस्ती रहावी, परंतु कडवें होऊं नये. माणूस किंवा जनावर मारूं नये. ऐसें दौलतींतील केवळ रत्नच होतें. तो रात्रीस सुटून बाहेर जाऊन शनवारांत विहीर होती त्यांत महात व लोक [ मागें ] असतां पडला आणि निवर्तला. याजमुळें बहुत खिन्न जाले, आणि बोलले जे, " याउपरि आमचा पुढें काळ विपर्यास येईल, वार्धक्यही जालें, संतानही नाहीं. संभाजी राजे आहेत तेही वृद्ध झाले.

---

१५. कोल्हापूर प्रत " येशवंतराव. "

१६ ' गजराबाई ' या शब्दापुढें मूळांत जागा कोरी आहे. तेथें आडनांव देण्याचें राहिलें असावें.

१७. बादली=जरीचा.

१८. जाबता=यादी, व्यवस्थापत्रक,

१९. इहिदे अर्बैन ( मया व अफल )= ११४१.

त्यासही संतान नाहीं. पुढे राज्याची काय दशा होईल नकळे. बरें असो. मालोजी महाराज यांचे कनिष्ठ बंधु विठोजी राजे यांचे आठ पुत्र यांचा वंश बहुत आहे व सरीफजी राजे शहाजी महाराज यांचे बंधु यांचा वंश आहे. ते सर्व श्रीचा वर जाला त्यांतील अधिकारीच आहेत," बोलले. आणि वंश आहे त्यांत चांगला मूल कोण, कोठें, राजचिन्हें व बुद्धि करून लक्षणें [करून युक्त] व शूर व उदार व चतुर, धीर ऐसे पहाणें, शोध करणेस लाविले. परंतु दोन दौंडे होते त्यांतून थोरली राणी यांचे विचारें सिद्धांत होऊन आला नाहीं. या प्रसंगांत धाकटी धणीन सगुणाबाई यांचे शरीरीं व्यथा निर्माण जाली. त्यास उपाय व अनुष्ठानें वगैरे लक्षावधि रुपये खर्च करविला. परंतु आरोग्य न होय, याजवरून बहुत उद्विग्न जाले.

या समयांत कोण्ही ब्राह्मणास कुष्टरोग होता तो श्रीव्यंकटेशीं[22] अनुष्ठानास बसला. त्यास दृष्टांत जाला जे, शाहूराजे स्नान करतील तें उदक घेऊन आंगास लावावें. कुष्ट जाईल." यावरून येऊन सांगितलें. ब्राह्मणास आम्हीं शेष उदक कैसें द्यावें, बोलोन बाळकृष्ण मूर्तीस आपले हातें स्नान करवून तें तीर्थोदक स्नानास दिल्हें. ब्राह्मणांचे देवाचे तीर्थप्रसादें आम्ही हें राज्य भोगितों. आम्ही कसें द्यावें ! बोलले. देवाचें दिल्यें त्या योगें कुष्ट परिहार ब्राह्मणाचें[23] जालें.

गोविंद खंडेराव यांस सेनापतीकडील दरमहा नेमणुकेचा ऐवज बहुत थकला म्हणून भोरगांवीं सेनापति होते तेथें रवाना करून ऐवज वसूल करावा आणावयास पाठविलें. लिहिणें बापूजी खंडेराव यांचे पुत्र प्रबुद्ध होते त्यास सांगितलें. तेरीख रामरावही कांहीं प्रबुद्ध झाले त्यांणीं करावीसें केलें. धाकटी धणीन यांस व्यथा अधिक जाली. महाराजांची प्रीति गोविंदरात्र व येशवंतराव देवराव यांजवर [ होती. ] याजवरून धाकटी धणीन ज्या माणसांवर महाराज कृपा करतील त्या माणसांवर आपण कृपा करावी, ऐसें होतें. गोविंदाराव यांस सत्वर आणावें सांगितलें. याजवरून आणविलें. प्रधानपंत यांस आणविलें. बहुतच व्यथा जहाली याजवरून श्रीजेजूरीस घेऊन जावें ऐसें ठरोन महाराजच घेऊन गेले. तेथेंही अनुष्ठानप्रसंग बहुत दानधर्म करविला. आयुर्दाय सरला. तेथेंच समाप्ति जहाली. यानंतर श्रीमाहुलीस दहन करावयाचें म्हणोन शेंपन्नास मराठे शिबिकेस सिद्ध करून माहुलीस घेऊन आले. दहन जालें. उत्तरकार्य तेथेंच राहून करविलें. दानधर्म बहुत करविला. शके १६७० विभवनामसंवत्सरे, तिसां अर्बैन

२०. वाडा, महाल, देहुडी यांचा अर्थ राणी असा होय.

२१. धावडशीच्या स्वामींचें चरित्र पृष्ठ १७–१८ पहा.

२२. वेंकटगिरी कर्नाटकांत आहे.

२३. राजस्पर्शानें दुर्धर रोग दूर होतात अशी याकाळीं इंग्लंदांतही साधारण समजून होती. ॲान राणीचा हस्तस्पर्श डॉक्तर जानसन यांस मुद्दाम अशाच हेतुनें करविला होता.

मया व अल्लफ. महाराज बहुत यांगी[24] जाले. थोरली धणीन सकवारबाई साहेब मर्जी तसें चालणें, आज्ञा पालन करणें हें न करितां आपणांस पाहिजे तो पुत्र घ्यावयाचा वगैरे राजकारणें प्रतिनिधि व यमाजी शिवदेव वगैरे यांशीं निराळा जमाव राखणें वगैरे चालविलीं. यावरून पुत्र नाहीं वयही बहुत जालें. अडुसष्ट होऊन सत्तरीचा सुमार जाला. या उपरि पुत्र असोन त्याचे स्वाधीन राज्य करोन आपण आपले सार्थकाचा विचार पाहण्याचा समय. शरीरशक्तिही कमी. श्रीपतराव प्रतिनिधि व मदारी हत्ती आपले राज्याचीं रत्नें गेलीं. बाजीराव प्रधान वगैरे सरकारकून गेले. पुढें समुद्रवलयांकित राज्य संपादिलें हें संरक्षण कसें होईल, म्हणून बहुत विचार राहून पुन्हा सातारियांत रहावयास जावयाचें नाहीं. श्रीकृष्णातीरींच वास करावयाचा, म्हणून माहुली पासून सातारामध्यें वाडी होती ते अरण्यवास म्हणून तेथेंच डेरे व छावणी छपरबंदी करून राहिले. त्यास वनवासवाडी असें म्हणूं लागले. आणि पुत्र घेण्यास कसे असावे म्हणून खानवटें व मुंगी व हिंगणी बेरडी या [ भोंसल्यांच्या ] घराण्यांतील चांगलीं शहाणीं ऐशीं मुलें पहाण्यास आणून योजून योग्य लक्षणें राजचिन्हें पाहून एक निश्चय करावा, ऐसें महाराजांनीं मनामध्यें धरिलें. तों सकवारबाई साहेब यांचें बोलणें प्रतिनिधि वगैरे मत निराळें, आपणास पाहिजे तो घेऊं, ऐसें पडलें. प्रधानपंत व चिटणीस, पोतनीस देवराव वगैरे मुत्सद्दी यांचें मत जे महाराजांचे मनांत सिद्ध होईल तें करावें, ऐसें एक मत निराळें पडलें. त्यांत ताराबाई साहेब सातारियावरि कैदेंत नजरबंद होतीं. त्यांनीं सांगून पाठविलें जे, " दुसरें मूल कां पाहतां ? राज्यास धणी शिवाजीराजे आपले पुत्र त्यांस मूल जालें तें मीं गुप्तरूपें ठेविलें ते असोन दुसरे दत्तक कां करितां ? " यावरून सर्व मुलें आणविलीं त्यांचा निश्चय कोणताच जाला नाहीं. होणारानुरूप घडून आलें नाहीं. सर्व मुत्सद्दी व सर्वांस असें करावें हेंच सांगणेस सामर्थ्य न घडे.

गंगाधर स्वामी चाफळकर समाप्त जाले. त्यांस पुत्र लक्ष्मणबावा ते मठाचे आधिपति करून चाफळ व परळी संस्थानचा बंदोबस्त [ करविला. ] उत्साह महोत्साह यथास्थित व्हावयास गांव जमिनी व मोइनी[25] वस्त्रें यथास्थित करून दिल्हीं. त्यास कल्याणस्वामी गोसावी समर्थ समाधिस्त जालियावरि पंचवीस तीस वर्षें होते. समर्थांनीं मठास अधिकारी श्रेष्ठांचे चिरंजीव आहेत अशी आज्ञा केली. त्याप्रमाणें गंगाधर महाराजांनीं केलें. आपण[26] डोंबगांवीं राहून येणें तें चाफळ येथें येऊन गंगाधरस्वामींची मर्यादा समर्थांप्रमाणें करून परळी किल्ल्यासच प्रदक्षिणा करून जावें ऐसें करून राहिले. ते सैमाप्त[26]

२४. यागी=दुःखी, संतप्त
२५. मोइन=( निश्चितपणा, ठोकळ, )= ठोकळ ( रक्कम ) वार्षिक.
२६. कल्याणस्वामी.

जालियावरि तेथें शिष्य ब्रह्मचारी होते त्यांस आधिपत्य त्यांनीं दिल्हें. ते पन्नास शिष्यमंडळीसह चाफळीं रामनवमीचे उत्साहास आले. नवमीचा प्रसादविडा तो आपणास, निस्पृह वडील शिष्य कल्याणस्वामी त्यांचे आपण, आपणास द्यावा म्हणून गर्गशा केला. हें कळोन महाराज आपण नवमीस उत्साहास गेले. तेथें लक्ष्मणस्वामीस डोंबगांवकर[२७] यांणीं कलह करून घेऊन बसले. हें पाहून हुजरे लावून सर्व शिष्यमंडळी बेटांखालीं घालवून आपण कीर्तनास बसोन नवमीचा प्रसादविडा लक्ष्मणबावा स्वामीस दिल्हा. आणि एक मुक्काम करून लळिताचा प्रसाद घेऊन स्वारी परत आली.

नारबावा मंत्री वारले. त्यांचे पुतणे दोन दोघे भावांचे, एक घनबावा व एक त्रिंबकराव. दोघेही आपण अधिकारी व्हावें बोलों लागले. त्यास घनबावास मंत्रीपदाचीं वस्त्रें देऊन वतन तीस हजार सरंजाम इनाम त्यांजकडे चालावेसें करून दिल्हें. त्रिंबकराव नारायण असेंच म्हणूं लागले. त्यांस सरदेशमुखीचे गांव महाल कासेगांव, पंढरपूर व मोंगलाईंतील नेमून देऊन त्यांस तीस हजार वेतन नेमून देऊन अंजहत सरदेशमुख ऐसे मुनालीक किताब देऊन मामल्याचा ठराव रसद वगैरे ठरावून त्यांजकडे देऊन उभयतांची समजूत पाडिली.

महाराजांचे शरीरीं बाळत्वापासोन सत्तर वर्षें वय होय तों दुखणें किंवा व्याधि कधीं जाली नाहीं. बहुत दृढ होते. वारा, उष्ण, पर्जन्य उघडे सर्वकाळ आंगावर बहुत सोसणें, शिकारींत वगैरेही मस्तकीं पागोटें नाहीं, ऐसेंही बहुत दिवस व्रत चालिलें. विजार किंवा धोतर इतकें मात्र असावें. शालजोडी, पासोडी पुढें पालखींत असावी. प्रसन्न मर्जी ज्याजवर होईल त्यास वरचेवरि आंगावरील बक्षीस द्यावे. पुन्हा दुसरीं ठेवावीं, आंगावर घणें कोण्हे समयीं घ्यावें, ऐसें चाललें होतें. महाराजाचे शरीरीं ज्वराची व्यथा निर्माण जाली. तेव्हां बहुत उदासवृत्ति धारिली. सर्वकाळ आत्मचर्चा, पुराण, श्रवण, दान, धर्म ऐसें व्रत चालविलें. सर्व अष्टप्रधान मुख्य प्रधानासह समीप असावे ऐसी आज्ञा केली. " आमचे शरीरीं जन्मापासोन व्यथा नाहीं ते निर्माण जहाली. या उपरि बहुत दिवस राहावयाचें नाहीं, लौकरच समाप्तिकाळ आहे. " [ अशी ] चर्चा करूं लागले. यावरून सर्व सेवक लोक प्रधान व सरदार यांस बहुतच उत्कंठा व दुःखाचे पर्वत जाले. आणि पुढें विचार कसा होईल ? महाराजांनीं उदासवृत्ति धरिली, शरीरीं व्यथा दिवसेंदिवस अधिक होत चालली, संतान नाहीं, राज्याचा विचार कसा होईल ? म्हणून प्रधानसह सर्वांनीं धैर्य करून महाराजांस विनंति केली जे, " पुढें राज्य चालण्याची सर्वांस आज्ञा कशी ते जाली पाहिजे. " यावरून उत्तर

---

२७. कल्याणस्वामीचे शिष्य डोंबगांवकर.

२८. बेट ? समाधीचा मधला भाग ?

२९. अजहत देशमुख ?

सांगितलें कीं, " पुत्र व्हावयाचा असता तरि तसाच पुण्यवान् जाला असता कीं नाहीं ! व पुत्र जाला तो वांचला असता. दत्तपुत्र करावे तरी थोरली धनीण राहिली ती मनस्वी, आपले चित्तांत येईल ते मनसबा करितात. तुम्हांस सर्वांस घेऊन पुत्र घेऊन राज्य संभाळावें ऐसें त्यांचे दैवीं नाहीं. संभाजी राजे आहेत त्यांचा वृद्धापकाळ त्यांसही संतान नाहीं. राज्याचे धणीच परंतु इतके सर्वांस घेऊन राज्य संभाळावें ऐशी बुद्धिवैभव आंवरणें शक्ति नाहीं. त्याजकरितां दत्तपुत्र घेणेंच प्राप्त. खानवटें, मुंगी, सिंगणापूर, हिंगणी सर्व अधिकारी बाबाजी महाराजांचा वंशविस्तार आहे. यांतून दैव ज्यास असेल तो लक्षणवान् अधिकारी करण्यास तुम्ही मोठेमोठे सेवक लोक कोट्यावधि द्रव्य मुलुख व लाखों फौजेचे अधिकारी करून ठेविले आहेत. त्यांत ताराबाई साहेबांचें म्हणणें मूल गुप्तरूपें ठेविलें आहे. त्याचा पक्केपणी शोध होऊन खरेच आहेत तरि दत्तक घेणें. अस्सल वंश असतां पुढें निभावणेस कलह पडतील. यास्तव शोध नीट आधीं जाला पाहिजे. " म्हणोन आईसाहेब यांजपाशीं गोविंदराव यांस पाठवून त्यांजपासोन जाला मजकूर सर्व लेहून आणिला. त्याजवर आपले हातें लिहून ठेविलें. आणि अमात्य यांचे घरीं ठेविलें प्रथम लिहिलें यावरून बावडेकर बाजीराव भगवंतराव आणवावेसें केलें. त्यांची येण्याविशीं खातरजमा न होय यावरून येशवंतराव पोतनीस व गोविंदराव पाठवून करविली. आणिले. श्रीकृष्णा सांनिध्य त्यांस विचारिलें. त्यांणीं खरें आहे, पांच वर्षांचें मूल होय तें आमचे घरीं ठेवून नंतर पानगांवाकडे दर्याबाई निंबाळकर त्यांची बहीण त्यांचे आश्रयास पाठविलें, " सांगितलें. मूल आहे तें खरें आहे ऐशी खातरजमा जालियावरून, " दुसरे दत्तक घेणें अस्सल असतां युक्त नाहीं व निभावणार नाहीं. बखेडे होतील. संभाजी राजे मालकच आहेत. परंतु हें तें राज्य एक केलें असतां त्यांजमध्यें तुम्हां सर्वांस घेऊन सर्वांचें संगोपन करणेचें बुद्धिवैभव नाहीं. त्यांचाही वृद्धापकाळ जाला. त्यांसही दत्तकच घेणें प्राप्त. यावरून तुम्ही सर्वांनीं एक विचारें राहून आमचे मागें त्यास आणून मुलासच धनी करून सर्वांनीं त्याचे आज्ञेंत चालून राज्य रक्षावें " बोलले. हें वर्तमान धणनीस समजलें. त्याजवरून बहुत रोषें करून निराळे विचार राजकारणें करूं लागली. धनिणीचें म्हणणें ताराबाई नातु आहे म्हणतात तें केलें असतां सर्व आधिपत्य त्यांजकडेस जाऊन आपण त्यांचे आज्ञेंत रहावें लागेल. यास्तव आपणास पाहिजे तसा दुसरा दत्तक घेऊं ऐशीं बोलणीं पडलीं. यावरि महाराजांनीं बाळाजीपंत प्रधान यांजकडील कारकून पांचशें स्वार पथक व गोविंदराव चिटणीस यांजकडील कारकून विश्वासुक देऊन रवाना पानगांवीं केले. मुलाची उस्तवारी व

१०. अमात्य बावडेकर, कोल्हापूरचे. | ११. त्यांची=भवानीबाई इची ?

रखवाली करविली. याजवरून धणी साहेब यांचा प्रधान, चिटणीस व देवराव येशवंतराव पोतनीस यांचे ठिकाणीं बहुत रोष जाला. प्रतिनिधि दादोबा व यमाजीपंत यांस विचारांत घेऊन त्यांची फौज जमाव करून करवीरीं संभाजी-राजे यांजकडे राजकारण त्यांणीं यावें ऐसें पाठविलें. आणि पानगांवीं आपणां-कडून खंडेराव न्यायाधीश पाठवून ठेविले. ताराबाई साहेब यांचा बंदोबस्त करावा म्हणून गडकरी व किल्लयाचे सुभे यांशीं राजकारण केलें. प्रधान चिट-णीस कारभारी गाळून प्रतिनिधीकडून कारभार राजकारण चालविलें. यांत महाराजांचे शरीरीं पीडा अधिक होत चालली. यावरून महाराजांस व्यथा बहु-त होत चालली. सर्व कारभारी बखेडे व चार करितात यांचा प्रवेश महाराजां-पर्यंत होऊं नये, ऐसा विचार [ बाई ] करूं लागली. त्या समयीं महाराजांनीं मनीं आणिलें " हा समय कठीण. सरदार आणविले ते येऊन पावत नाहींत. प्रधान यांजहून बलवान् विचारवानही कोण्ही नाहीं. " त्यांस एकांतीं बोलावून आपले हातची यादी लिहून त्यांत कलमें पन्हाळ्याचें [ व ] हें राज्य एक न करावें. तेथील घेऊं नये. दुसरें मूल आहे म्हणतात तें करावें. त्याचे आज्ञेंत राहून सर्वांचें आहे तसें चालवून तालुके ज्याचे त्याजकडे व सरदारी चालवून त्यांचे नजर पेशकशी व हुजूर महाल व किल्ले राज्य चालेल तें तसें चालवावें. ऐशीं कलमें [ लिहून ] सदरहुप्रमाणें चालवितों म्हणून शफतयुक्त लेहून घेत-लें. त्यांसही राज्यास अधिकारी दत्तक होतील ते तुम्हांस अंतर देणार नाहींत म्हणून चिठ्ठी दिली. गोविंदराव यांचे विद्यमानें एकांतीं यादी ठरेवून दिली.

राणी साहेब यांणीं महाराजांस दुखणें बहुत व्यापिलें, वाड्यांत न्यावयाचे म्ह-णून येऊन सातारियास वाड्यांत चलावें म्हणून आग्रह करून रंगमहालांत नेलें. आणि वाड्यांत व बाहेर सर्व आपला बंदोबस्त करविला. चौकी पहारे ठेवून प्रधान व चिटणीस व देवराव पोतनीस यांचा प्रवेश परवानगीशिवाय होऊं नये ऐसें केलें. महाराजांपाशीं गेले तरि आपले कारकून जवळ असावे-सें केलें. वाड्यांत येतां जातां प्रधान व चिटणिस यांस दगा करवावा ऐसे वि-चार चालले. महाराजांचें मनोगत व आज्ञा तसें शेवटास लागावें म्हणून प्रधान

---

१२. ही यादी खुद शाहूनें लिहिली असें म्हणतात. ह्या मूळ लेखाची एक नक्कल आ-म्हांस मिळाली आहे ती येणेंप्रमाणें:—

" राजमान्य राजश्री बाळाजी प्रधान पं-डित यांस आज्ञा तुम्ही फौज धरने आज्ञा के-ली त्याच्या दैवीं नाहीं महाराजास दुखने झा-लें नाहीं (?) बरें होत नाहीं राज्यभार चाल-ला पाहिजे तरि पुढें वंश बसवून कोल्हापूरचे न करने चिटणिसास सर्व सांगितलें तसे करने वंस होईल त्याच्या आज्ञेंत चालने राजमंडळ चालवने. चिटणीस स्वामीचे इस-वासू त्याच्या विचारें राज्य राखने वंश होईल तो तु * * करनार नाहीं. सुदन असा "

श्री शाहू छत्रपति स्वामी यांणीं प्रधान पंत कैलासवासी नाना साहेब यांस वरप्रदान देऊन चिटी लिहिली ती प्रथम स्वदस्तुर महाराज.

व कारभारी यांणीं ताराबाई साहेबांचें समाधान [ करून ] त्यांजपाशीं यादो गोपाळ यांचे पुत्र गोपाळराव यादव व बाजीराव यादव होते, चिंतो वामन सागांवकर व अतुर्बळीपंत व मोरो शिवदेव थिटे हे गोविंदराव यांजकडील त्रिवर्ग रुस्तुमराव वाकनीस करवीरकर आईसाहेबांपाशीं होते यांचे हातें राजकारण राखिलें. बाजीराव बावडेकर अमात्य यांसि ठेविलें. किल्ल्यावरील राजकारण बंदोबस्त आनंदराव जाधव हवालदार व जोती अनंत सुभेदार यांचे हातें महादोबा पुरंदरे व गोविंदराव चिटणीस यांजपासोन करविलें. आणि महाराजांची आज्ञा व अस्सल मूल आहे तेंच अधिकारी करावें ऐसा मनसोबा सिद्ध जाला. राणी साहेबांचा मनसोबा हे गोष्ट न घडावी, आपण पाहिजे तो मूल घ्यावा. ताराबाईचा बंदोबस्त राखून आपण राज्यकारभार चालवावा, ऐसा चालला. महाराजांपाशीं प्रधान पंत व गोविंदराव यांणीं जाणें तें हजार पांचशें एकांडे मानकरी निवडून वाड्यांत जावें. आपला सर्व बंदोबस्त राखून नंतर महाराजांपाशीं जावें, ऐसें प्राप्त जालें. हरप्रकारें यांस जिन्यांत वाटेंत दगा करावा ऐसें राणीसाहेब करूं लागलीं. आणि महाराजांपाशीं आग्रह करून बोललीं तेव्हां "तुझे करणार राज्यकारण विश्वासी कोण आहेत, शेवटास कसें जाईल ?" विचारिलें. तेव्हां दादोबा प्रतिनिधि व यमाजीपंत व सेनापति आहेत बोलली. "ते तरि लांब राहिले, फौजेविना शेवटास जाणार नाहीं. प्रधान वगैरे यांस आपले विचारांत घेऊन त्यांचे विचारें चालावें तें मानत नाहीं. त्यास विश्वासु असतील त्यांस फौज जमा करावयास सांगावें" बोलले. दादोबांस राणी साहेबांनीं सांगितलें ते सात आठ हजार जमा जाले. प्रधान यांसही आज्ञा जाली हा समय फौज जमाव असावा ऐसा आहे. त्यांणीं चोवीस तीस हजार जमाव केला. फत्तेसिंगबावा "मजला राज्यभार चालवणें आटोपणार नाहीं" बोलले. महाराजांनीं "राजपुत्र दत्तक घेऊन तुम्हीं त्यांचे आज्ञेत चालून सर्व कारभारी यांचे विचारें चालावें" सांगितलें. परंतु घडलें नाहीं. आपलाच बंदोबस्त करून पत्र स्वदस्तुर शिक्क्याचें द्यावें बोलले यावरून दिल्हें. रघोजी भोंसले यांस जलद येण्याचीं पत्रें पाठविलीं. बाहिरव खंडेराव चिटणीस सत्वर घेऊन यावे म्हणून रवाना केले. परंतु समयास येऊन पोंचले नाहींत. सेनापति [ व ] गायकवाड यांस पत्रें गेलीं. सेनापति व्यसनी जाले. समयीं आले नाहींत. यमाजीपंत यांणीं राणीसाहेबांचे आज्ञेनें ताराबाई साहेबांचा बंदोबस्त राखावा म्हणून आपले बंधु अंताजी शिवदेव व कांहीं लोक पाठविले. तेव्हां प्रधान व गोविंदराव यांणीं किल्ल्याचे अधिकारी यांजशीं राजकारण राखिलें होतें. व महाराजांची आज्ञा होती. आणखी खर्चास व बक्षिसें देऊन चार दिवस अंताजी शिवदेव व लोक राणी साहेबांकडील वरते राहिले ते उतरोन दिल्हे. यावरून राणी

साहेबांनीं संभाजी राजे यांस फौजसुद्धां यावें म्हणून लिहून आणविलें. यावरून महाराजांनीं बापूजी खंडेराव यांस दुसरे वेष देऊन त्यांजकडील कारभारी यांणीं व जीजाबाई साहेबांनीं या खटलियांत आपण पडून शेवटास जावयाचें नाहीं. [ असें ] राजे यांणीं सांगितल्यावरून पुढें न येतां माघारें जावें ऐसें जालें. महाराजांचे शरीरीं व्यथा बहुत झाली. सर्वांस प्रधानासह बोलावून, " राज्यास धणी पुत्र करून, सर्वांनीं आज्ञेंत चालून राज्य देवब्राह्मणांचें हें एक विचारें रक्षावें. " आज्ञा केली. आणि शके १६७१ शुक्लनामसंवत्सरे सन खमसेन मया व अलफ मार्गशीर्ष वद्य तृतीया शुक्रवारीं देह ठेवून कैलासवास केला. तोंपर्यंत राज्याभिषेक ७६ गुदरले.

याप्रमाणें शाहू महाराज यांणीं बेचाळीस वर्षें राज्याभिषेक यवनाचे नजरबंदींतून येऊन अप्रतिहत आज्ञा पृथ्वीचे ठायीं ऐसें करून परम पुण्यश्लोक होत्साते कैलासवास केला. तो समय परम दारूण ! सर्व प्रजा व लोक अष्टप्रधान आदि करून यांस प्रळयच गुजरला ! प्रधानपंत व गोविंदराव कारभारी व सरदार यांणीं शहरची नाकेबंदी करून, वाड्याभोंवत्या चौक्या व कारखाने यांस चौक्या पहारे याप्रमाणें करून, प्रधानपंत वगैरे गोविंदराव यांचे वाडियांत येऊन बसले. आणि राणीसाहेब यांचे तीर्थरूप[33] कुवारजी शिर्के यांस बोलावून नेलें आणि सांगितलें जे, " बाईसाहेबांची मर्जी कशी आहे? महाराजांसारखें रत्न गेलें ! पुढें राज्यभार चालवणें त्यास आम्हांस सर्वांस घेऊन महाराजांची आज्ञा जाली आहे त्याप्रमाणें राज्याचे अधिकारी करून करावयाचें आहे. आम्ही सर्व आज्ञांकित, महाराज तेच बाईसाहेब आहेत. किंवा सहगमन करण्याचा संकल्प आहे. हें विचारून यावें " म्हणून पाठविलें. आणि " आपणापाशीं बखेडा करणार कारभारी यांचा बंदोबस्त महाराजांचे आज्ञेनें करितों " म्हणून सांगून पाठविलें. आणि दादोबा प्रतिनिधि आणि यमाजीपंत व त्यांचे लोक या भोंवते आपले लोक पाठवून नजरबंदी करविली. शिर्के यांणीं बाईसाहेबांस निरोप सांगितला. तेव्हां बाईसाहेबीं विचार केला जे, " सर्व प्रकारें बलवान् प्रधानपंत व गोविंदराव व सर्व कारभारी होऊन ताराबाईचे नातु राज्यावर बसवणें हें राजकारण सिद्ध जालें. तेच पुत्र घेऊन आपण रहावें तरि त्यांचे आज्ञेंत चालून ताराबाईचे आज्ञेंत चालावें यांत शोभा रहावयाची नाहीं. आपण दादोबा व यमाजीपंत यांचे नादीं लागून प्रधान, चिटणीस व कारभारी सर्व तोडिले आणि मसलतही प्रतिनिधीनें शेवटास नेली नाहीं. याउपरि रहाणें व्यर्थ आहे. " म्हणोन सहगमन करण्याचा निश्चय केला. " जाली ती गोष्ट बरीच जहाली. महाराज गेले, आम्हांस

---

३३. ग्रांट् डफ् " भाऊ " असें म्हणतात.

रहावयाचें नाहीं. तुम्हीं सर्व महाराजांची आज्ञा जाली असेल तसें करून राज्य राखावें," बोललीं. पदर टाकिला. आणि साहित्य लौकर करावें म्हणून आज्ञा पाठविली. याप्रमाणें निरोप येतांच तात्काळ प्रतिनिधि व यमाजीपंत यांस आणावयास पाठविलें. यमाजीपंत कुळंबिणीचे घरांत गुप्तरूपें राहिले ते आणून बेड्या घालून कैद केले. आणि पुरंदर व कावनई किल्ल्यावर रवाना केले.

या नंतर सर्व कारभारी व प्रधानपंत व प्रजा यांणीं दोन पालख्या तयार करून वाड्यांत गेले. सर्व कारखान्यास कुलपें घालून चौकी पहारे बंदोबस्त केला. आणि उभयतां पालखींत सर्व राजोपचार वस्त्रें, जवाहीर, अलंकार करून समारंभें गेले. तेथील विधि यथाशास्त्र करणें तो केला. यानंतर उत्तरकार्य मालोजी भोंसले मुंगीकर यांजपासोन चालतें केलें. लक्षावधि रुपये दानधर्म, यथाविधि दानें, ब्राह्मणांस देकार व भोजनें करविलीं. पानगांवास आधीं बंदोबस्त केला होता. सर्व कारखाने व शागिर्दपेशा हत्ती, घोडे, जवाहीर पोषाक व खजीना देऊन बापूजी खंडेराव चिटणीस व बरोबर चिंतो विनायक ताराबाई साहेबांकडील देऊन महाराज राजाराम साहेबांस आणावयासि गेले. बराबर प्रधानपंत यांजकडील लिंबाजी अनंत म्हणोन सरदार फौजसुद्धां दिल्हे. ते पानगांवीं जाऊन मार्गशीर्ष अखेर निघोन येतां मार्गीं दर्याबाई निंबाळकरीण फौजसुद्धां बराबर घेतली. आईसाहेब खालीं राहून राजे आले त्यांची भेट बहुत दिवसांची म्हणून श्रीकृष्णातीरीं शकुन्तेश्वर याचे देवालयीं घेतली. सर्व लोक सामोरे जाऊन भेटले. शहरांत जाणें तें सुमुहूर्तानें जावें म्हणून वडुय आरळें नजीक मुक्काम करून राजे राहिले. तेथें सर्व सरदार लोक प्रजा यांच्या भेटी होऊन महसवें मुक्कामीं आले. याप्रमाणें शाहू महाराजांचें अवतारचरित्र समाप्त झालें. शिवाजी राजे यांचे अंशच निर्माण होऊन राज्य केलें. तें चरित्र समाप्त जालें. श्री शाहू महाराज छत्रपति व सकवारबाईस दहन श्रीकृष्णा-वेण्या-संगमीं प्रवाहांत जालें. त्या स्थळीं महाराजांचें लिंग पाषाणाचें व बाई साहेबांची मूर्ति यांची स्थापना केली. ते उभय प्रवाह कर्त्रींत मोठे मोठे पाषाणादि पदार्थ जातात त्या स्थळीं अचल पाषाणरूपें अद्याप प्रत्यक्ष राहिले.

चरित्र समाप्त.

---

१४. ग्रांट् डफ् यांणीं जो बाळाजीवर आरोप केला आहे त्यास येथें कांहीं आधार नाहीं.